

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत




वर्ष ५७ । अंक ९ । जून २००४
जेष्ठ-आषाढ, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका










# नवभारत

जून २००४

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन



अनुक्रमणिका

# लोकशाही समाजवादाच्या उभारणीचा साधनमार्ग

वसंत पळशीकर

१९९० च्या दशकात सोविएत रशियाचे विघटन झाले. साम्यवादी राजवटींच्या देशांतही 'मार्केट सोशलिझम'चे युग अवतरले आणि आज तर 'जागतिकीकरण, उदारीकरण व खाजगीकरण' जगभर थैमान घालीत आहे.

बोल्शेविकांनी रशियात (आणि पुढे चेअरमन माओ यांच्या नेतृत्वाखाली चीनमध्ये) जो 'साम्यवाद' प्रस्थापित व प्रमाणित केला तो आज कालबाह्य झाला आहे. युरोपीय धाटणीचा 'लोकशाही समाजवाद' तर कधीच भांडवलशाही व्यवस्थेने खाऊन टाकलाय.

पण समता, बंधुभाव, न्याय या मूल्यांच्या पायावर शोषणमुक्त समाजाच्या उभारणीचे ध्येय कालबाह्य झालेले नाही. उलट ते अधिकच प्रासंगिक व प्रस्तुत बनले आहे. नितांत निकड आहे ती भारतीय समाजवास्तव ध्यानात घेऊन, आणि गेल्या शे-सव्वाशे वर्षांचा जागतिक अनुभव लक्षात घेऊन, 'लोकशाही समाजवादा'ची आपल्यासाठी फेरमांडणी करण्याची.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमीने (सातारा) याबाबतीत पुढाकार घेऊन १ व २ फेब्रुवारी २००४ रोजी सातारा येथे एक प्रारंभिक बैठक आयोजित केली होती. या बैठकीत श्री. वसंत पळशीकर यांनी सादर केलेली दोन टिपणे येथे प्रकाशित करीत आहोत.

*- संपादक*

---

## १. राज्यसत्तेच्या मर्यादा

मार्क्सवाद ही विचारप्रणाली 'अराज्यवादी' असल्याचे, 'the state will wither away', राज्यसंस्थेचे काम 'administration of things' एवढेच असेल, यांसारख्या सुप्रसिद्ध वचनांच्या आधारे म्हणता येईल. तर, 'डिक्टेटरशिप ऑफ दि प्रोलेटारियट' या वचनाच्या आधारे ती 'कष्टकरी वर्गाची सर्वाधिकारशाही' असते असेही म्हणण्यास आधार सापडू शकतो. त्याच वेळी, 'सोविएत' हा शब्द ज्या अर्थाने वापरला गेल्याचे आठवते त्या आधारे 'लोकसहभागाधिष्ठित विकेंद्रित ग्रामस्वराज्य' ही पायाशी असलेली संरचना कल्पिलेली होती, असेही म्हणता येते.

कामगारवर्गीय राज्यसत्ता सनदशीर शांततामय मार्गांनी प्रस्थापित होऊ शकणार नाही, होऊ दिली जाणार नाही; सशस्त्र उठावाच्या स्वरूपात प्रस्थापित प्रतिक्रांतिकारक राज्यसत्तेला ध्वस्त करूनच शेवटी नवे राज्य अस्तित्वात येईल, अशी मान्यता आजही पूर्णपणे लोप पावलेली नाही. इंग्लंडमध्ये 'फेबियन सोशलिझम' ही विचारप्रणाली प्रभावी होत गेली कारण राजकीय संघटन बांधून निवडणुकांद्वारे पक्ष म्हणून प्रबळ होत जाण्याचा रस्ता मोकळा असल्याचा अनुभव व्यवहारात येत होता. तरी पण, इंग्लंडमध्येही, मध्यवर्ती राज्यसत्ता ठप्प करून सत्तेचा प्रस्थापित व्यूह बदलविण्याची कांक्षा व उद्देश डोळ्यासमोर ठेऊन १९२६ साली 'सार्वत्रिक संपा'चे हत्यार वापरले गेले. याचा अर्थ असा की, सशस्त्र उठावाच्या स्वरूपात जरी नाही तरी, राज्यक्रांती घडवून आणणारी एक नाट्यपूर्ण कृती शेवटचा धक्का म्हणून आवश्यक ठरतेच, ही धारणा शिल्लक राहिली.

आपल्या देशात नक्षलवादी विचारप्रणाली व संघटन, त्यांची सशस्त्र मार्गावर निष्ठा ठेवणारी रणनीती यांना, आपणास वाटते त्यापेक्षा जास्त व्यापक प्रमाणात, प्रच्छन्न समर्थन व मान्यता समाजातल्या बुद्धिजीवी वर्गामध्ये असल्याचे आढळेल. आणि लोकशाही मार्गांना बांधिलकी सांगणाऱ्या लोकशाही समाजवादी पक्षांच्या सैद्धांतिक भूमिका पाहिल्या तरी, प्रबळ केंद्रीभूत राज्यसत्तेच्या द्वाराच, अर्थात सांसदीय बहुमत संपादण्याचे पथ्य सांभाळून, अर्थव्यवस्थेची पायाभूत फेररचना करूनच







अनुक्रमणिका

समाजवादी समाजाची निर्मिती करण्याचीच गोष्ट आत्ता आत्तापर्यंत केली जात होती.

अगदी आरंभाला मार्क्सवादाचे म्हणून जे वैशिष्ट्य नमूद केले त्याही बाबतीत, कधीही उलथून टाकता येणार नाही इतक्या भक्कमपणे, खात्रीशीरपणे समाजवादी राज्य प्रस्थापित झालेले असणारच हे गृहीतकृत असल्याचे नजरेला पडते. या कारणानेच, भांडवलशाही वा सरंजामशाही वा पारंपरिक आधुनिकपूर्व समाजांमध्ये राहात असताना साम्यवादी पक्षांचा अग्रक्रमाचा एक-कलमी कार्यक्रम केंद्रीय सत्ता हस्तगत करणे व हातात राखणे हाच असल्याचे आढळते.

या सगळ्यामधून हाती येणारा बोध विचार करायला लावणारा आहे. तो असा की, साम्यवाद काय किंवा लोकशाही समाजवाद काय, यांची सारी मदार बलिष्ट राज्यसत्तेच्या सामर्थ्यावर असते. जनसामान्यांच्या भल्यासाठी सर्वव्यापी हस्तक्षेपावर भिस्त ठेवणारी राज्यव्यवस्था सार्वत्रिक व प्रबळ नोकरशाही व्यवस्था बनणे अपरिहार्य बनते. साम्यवादी राज्यसत्ता या एकपक्षीय सर्वाधिकारशाह्या राहिल्या, आणि पक्षयंत्रणा आणि नोकरशाही-यंत्रणा यांच्यात overlap राहिला. किंबहुना, भेदविलोपनाकडे कल राहिला. लोकशाही समाजवादी राजवटी या एकपक्षीय सर्वाधिकारशाह्या नसतात. त्यांच्या हातातून सत्ता जातेही. पण राज्य/अर्थव्यवस्था जितकी जास्त समाजवादाकडे झुकेल तितका राज्यसत्तेचा हस्तक्षेप वाढणे आणि नोकरशाहीचा विस्तार व पोच/हस्तक्षेप यांमध्ये वाढ होणे अटळ ठरते.

अनिर्बंध, खुल्या अर्थव्यवहाराचा व बहुतकरून शासनाचा हस्तक्षेप व पोच ह्यांना जास्तीत जास्त मर्यादा घालण्याचा सिद्धान्त पायाभूत म्हणून डांगोरा पिटण्याऱ्या आजच्या काळातील भांडवलशाही राज्यसत्तांकडे पाहिले तरी, केंद्रीय राज्यसत्ता प्रबळ असते, तिची पोच सर्वदूर असते आणि ती उत्तरोत्तर नागरिकांच्या व्यवहारांवर पोलिसी नजर ठेवणारी, त्यांचे नियमन व नियंत्रण करणारी बनलेली आहे, असे आढळते.

– २ –

पाश्चिमात्य समाजाच्या आधुनिक कालखंडावर नजर टाकली तर, वास्को-द-गामाचे कालिकत बंदरात आगमन किंवा कोलंबसाने लावलेला अमेरिकेचा शोध या गोष्टी जगाच्या राजकीय व आर्थिक व्यवस्थेचे एका नव्या पायावर पुनर्संघटन करणाऱ्या युगाची नांदी होत्या असे लक्षात येते. केंद्रीभूत सर्वंकष राज्यसत्तांची प्रस्थापना (the Absolutist State), त्यांच्या पुष्ट्यर्थ राष्ट्रवाद या विचारप्रणालीची निर्मिती व तिच्या आधारे लोकांची राजकीय निष्ठा केंद्रीभूत राज्यसत्तेला बांधून घेण्याची प्रक्रिया, केंद्रीभूत राज्यसत्तांच्या धारणेसाठी आवश्यक म्हणून व उपयोगाची म्हणून एका राष्ट्रीय अर्थव्यवस्थेची उभारणी, वासाहतिक राज्य व अर्थ व्यवस्थांच्या स्वरूपात साम्राज्याची निर्मिती (आणि जगाची साम्राज्यवादी सत्तांमध्ये वाटणी) आणि साम्राज्यसत्तांचे भांडवलशाही-लोकशाही राज्यव्यवस्थांमध्ये प्रवर्तन, या सर्व प्रक्रिया एकमेकांमध्ये गुंतलेल्या, गुंफल्या गेलेल्या प्रक्रिया आहेत, असेही लक्षात येईल.

पाश्चिमात्य जगात या प्रक्रियांचा परिणाम म्हणून एका टप्प्यावर आधुनिकपूर्व सरंजामशाह्या-राजेशाह्यांचा अंत झाला आणि "बूर्ज्वा" या नव्याच वर्गाच्या उत्कर्षाच्या आधारे भांडवलशाही-लोकशाही राज्यसत्तांची प्रस्थापना होत गेली. अगदी आरंभापासून ही एक जागतिक राज्य-अर्थव्यवस्थाच राहिली आहे, हे ध्यानात घेतले पाहिजे.

मागे वळून पाहिले तर, साम्यवाद-लोकशाही समाजवाद या विचारप्रणाली व या विचारप्रणालींच्या पायावर प्रस्थापित-राज्यसत्ता व अर्थव्यवस्था हा वरील जागतिक पुनर्रचनेतीलच एक उपप्रवाह राहिला असल्याचे दिसते. पश्चिमी देशांतील लोकशाही समाजवादी पक्षांची वाटचाल पाहिली तर हे तथ्य स्पष्टपणे समोर येते. साम्यवादी राजवटी या भांडवलशाहीच्या पुढच्या टप्प्यावरील पर्यायी व्यवस्था निर्माण करणाऱ्या आहेत असे वाटले; पण सोविएत रशिया व चीन या साम्राज्यवादी सत्ताच होत्या. थोडे खोलवर जाऊन पाहिले तर, सोविएत रशिया व साम्यवादी चीन हा सरंजामशाही ते भांडवलशाही-लोकशाही या प्रवासातील एक संक्रमणावस्थेतील टप्पा असल्याचे लक्षात येते. भारतात गेल्या पन्नास-पंचावन्न वर्षांमध्ये हेच मन्वंतर घडून येत आहे हे आपण स्पष्टपणे पाहू शकतो.

या कोनामधून पाहिले तर आपल्या मनावर एक गोष्ट ठळकपणे ठसते. मार्क्सच्या विचारव्यूहामधील एकाच घटकावर एकांगी व अतिरेकी भर दिला गेला आहे. भांडवलशाही लोकशाही व्यवस्था उलथून पडण्याची घडामोड कोणत्या नियमांनुसार घडून येईल याचा शोध मार्क्स त्याच्या उत्तरायुष्यात घेत होता. त्याच्या डोळ्यासमोर एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरील राजेशाह्याच होत्या. आणि पहिल्या टप्प्यावरील भांडवलशाही-देखील कामगार संघटनांवरही बंदी घालणारी, निर्घृण, हिंस्र



अनुक्रमणिका

कारखानदारीच्या विस्ताराची होती, हे पण ध्यानात ठेवले पाहिजे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धानंतर भांडवलशाही व लोकशाही यांच्या स्वरूपात व कार्यपद्धतीत फरक पडला. इंग्लंडमध्ये, या बदललेल्या परिस्थितीला प्रतिसाद म्हणून 'फेबियन सोशलिझम'ची मांडणी केली गेली असे म्हणता येईल. यानंतरच्या काळात 'राज्यक्रांती'ची रणनीती प्रगत भांडवलशाही-लोकशाही देशांमध्ये बाद झालेली आपल्याला दिसते. रशिया व चीन या देशांमध्ये सशस्त्र राज्यक्रांत्या घडून आल्या खऱ्या, मात्र मार्क्सने भविष्यवाणी वर्तविलेल्या या राज्यक्रांत्या नव्हत्या. पण याचा विपरीत परिणाम असा झाला की, लोकशाही समाजवाद असो की साम्यवाद असो, समाजवाद-साम्यवाद या विचारसरण्या राज्यसत्ताकेंद्रीच (Statist) राहिल्या आणि कालांतराने त्या कात टाकलेल्या आधुनिक भांडवलशाही-लोकशाही विचार-प्रणालीमध्ये सामावल्या गेल्या.

– ३ –

मार्क्सवादी परिभाषेतील 'फोर्सेस ऑफ प्रॉडक्शन' म्हणजे आपण ज्या शक्तींना उद्देशून 'तंत्रविज्ञान' हा शब्द वापरतो ती शक्ती होय. मार्क्सवादाची जी परिचित मांडणी आहे तिच्याप्रमाणे तंत्रविज्ञान ही भांडवलशाहीचे रूपांतर समाजवादी व्यवस्थेमध्ये घडवून आणणारी शक्ती आहे. पण यात एक गोची आहे. विज्ञान-तंत्रविज्ञान यांची मार्क्सवादामध्ये ऐतिहासिक-समाज-शास्त्रीय चिकित्सा आढळत नाही. म्हणजे, विशिष्ट वळणाने व दिशेने विज्ञान-तंत्रविज्ञानाची वाटचाल का झाली याची चिकित्सा आढळत नाही.

मार्क्सवादाच्या या उणीवेमुळे असे झाले की, भांडवलशाही जागतिकीकरणाच्या प्रेरणेमधून जे विज्ञान-तंत्रविज्ञान विकसित झाले तेच समाजवादी व्यवस्थेलाही आधारभूत मानले गेले. परिणामी समाजवादी व्यवस्था ही भांडवलशाही व्यवस्थेची प्रतिकृतीच बनणे अपरिहार्य ठरले. मग या दोहोंतला फरक कोणता? तर, विज्ञान-तंत्रविज्ञानासह अर्थव्यवस्थेच्या सर्व अंगांवर सामाजिक (म्हणजे व्यवहारात सरकारी) मालकी प्रस्थापित करण्यात येईल, हा गुणात्मक फरक ठरला. या कारणाने समाजवादी व्यवस्थेमध्ये राज्यसत्तेचे नियंत्रण सर्वंकष असणे आवश्यक असेल, ते समाजवादाचे एक वैशिष्ट्य व व्यवच्छेदक लक्षण असेल, असा सिद्धांतच मांडला गेला. तात्पर्य, साम्यवाद-समाजवाद ही भांडवलशाहीपेक्षा अधिक केंद्रीभूत, सर्वंकष सत्तावादी विचारप्रणाली बनली. सांसदीय लोकशाही राज्यपद्धती ज्या देशांमध्ये खोलवर रुजलेली होती त्या देशांमध्ये व्यवहारात या विचारप्रणालीला महत्त्वपूर्णरित्या मुरड घातली गेली. पण या देशांतही, समाजवादी व्यवस्थेत केंद्रीभूत, बलिष्ट राज्यसत्ता प्रस्थापित असेल हाच सिद्धान्त व व्यवहार राहिला.

– ४ –

आधुनिक विज्ञानामागील एक मुख्य व बलवत्तर प्रेरणा ज्ञानाचे रूपांतर सत्तेमध्ये करण्याची राहिली आहे. इंग्लडमधील रॉयल सोसायटीचे फेलो म्हणून निवड होणे हा एक अत्युच्च बहुमान मानला जात आला आहे. या संस्थेला राजाश्रय होता म्हणून तिचे नाव रॉयल सोसायटी असे पडले. केंद्रीभूत, सर्वंकष सत्ता प्रस्थापित करण्यात वैज्ञानिक संशोधन मदतीला येईल, हे आश्वासन यामागे राहिले असले पाहिजे.

निसर्गसृष्टीचे नियम जर आपण शोधून काढून हस्तगत केले तर त्यांचे उपयोजन करून आपण प्रबळ होऊ शकतो, निसर्गावर विजय संपादित करू शकतो ही धारणा अनुभवामधून उत्पन्न झाली व रुजली. यामधून प्रबळ सत्ताधीश बनण्यासाठी वैज्ञानिक संशोधन व तंत्रवैज्ञानिक उपयोजन हा मार्ग जाणीवपूर्वक अवलंबला गेला. पुढे जेव्हा निसर्गशास्त्रांचा, विशेषत: भौतिकीच्या (Physics) नमून्याबरहुकूम सामाजिक शास्त्रांच्या निर्मितीचा कार्यक्रम हाती घेतला गेला तेव्हा त्याचे पण एक मुख्य उद्दिष्ट ज्ञानाचे उपयोजन करून व्यक्ती आणि समाज यांचे पुनर्संघटन आपल्या हेतूपूर्तीसाठी 'शास्त्रशुद्ध' (scientific) पायावर करण्याचे प्रथमपासून राहिले.

केंद्रीभूत सर्वंकष राज्यसत्ता प्रस्थापित होण्यासाठी 'शास्त्रशुद्ध' पुनर्संघटन कामी येते आणि तंत्रज्ञानाच्या उपयोजनेमधून राज्यसत्तेचे सर्वंकष नियंत्रण वाढते. याच कारणामुळे भांडवलशाही-लोकशाही राज्यसत्ता आणि साम्यवादी राज्यसत्ता यांच्यामधील अंतर व्यवहारात कमी होत गेल्याचे दिसते.

इतकेच नाही तर, ज्ञानाची व्याख्यादेखील बदलत जाताना दिसते. ज्ञान कोणते, तर ज्या ज्ञानामुळे आपल्याला हवा तो बदल घडवून आणण्याची शक्ती प्राप्त होते ते ज्ञान. नव्या नव्या वैज्ञानिक संशोधनाविषयी, तंत्रवैज्ञानिक विकासाविषयी प्रसिद्धीमाध्यमांमधून लिहून येते तेव्हा या शोधांमुळे, या तंत्रविज्ञानामुळे 'माणूस' कसा शक्तिमान व सुखोपभोगसंपन्न

बनणार आहे, त्याचे जगणे कसे अधिक सुकर वा ऐषारामी बनणार आहे, त्याला सत्ता कशी प्राप्त होणार आहे हे सांगण्यावर भर असतो.

गेल्या चार-पाचशे वर्षांचा अनुभव जमेस धरला तर, एका अंगाने, वस्तु-वैपुल्य कल्पनातीत प्रमाणात साध्य झाले आहे. 'माणसा'ने निसर्गावर 'विजय' प्राप्त करण्यात नेत्रदीपक यश प्राप्त केले आहे. सुखोपभोगाचे मान वाढले आहे. पण, एक, जगात समाधान व शांती नांदत नाही; दोन, जगभरच सर्वसामान्य माणसे आज असुरक्षित, भय, हिंस्रता यांनी ग्रस्त आहेत. आणि सामान्य जनांच्या कल्याणाच्या, स्थैर्याच्या, सुरक्षिततेच्या नावाने लिबरल भांडवलशाही देशांमध्ये कमालीच्या सत्तावान राज्यसत्तांचे रूपांतर नागरिकांवर पोलिसी पाळत ठेवणाऱ्या, सर्वंकष संशय व भीती बाळगणाऱ्या यंत्रणांमध्ये होते आहे. सर्वंकष दमनकारी राज्यसत्ता साम्यवादी देशांनी अनुभवली आहेच.

– ५ –

कोणत्याही बृहत् समाजात राज्यसत्ता राहणार, आणि तिला पार पाडण्याची कार्ये पण राहणार. तसेच, उद्या राष्ट्र-राज्य ही संरचना व तिला पायाभूत असलेली राष्ट्रवाद ही विचारप्रणाली या जरी मोडीत निघाल्या तरी, मोठ्या प्रदेशावर कार्ये पार पाडणारी राज्यसंस्था ही राहणारच आहे. उद्योग व व्यापार यांची व्यापक व्यवस्था पण राहणार. प्रश्न हा आहे की, समाजवादाचे मर्म आपण कोणत्या गोष्टींमध्ये मानतो?

मार्क्स माणसाचे माणूसपण कसे समजून घेतो? त्याचे 'माणूसपण' पुढील वैशिष्ट्यांमध्ये सामावलेले त्याला दिसत होते. निसर्गतः माणसाला ज्या क्षमतांची देणगी लाभलेली असते त्यांचा वापर करून (म्हणजे 'उत्पादक श्रम' करून) निर्मिती करणे, त्या निर्मितीच्या द्वारा इतरांशी – निसर्गसृष्टीशी, इतर माणसांशी – आत्मीय, बंधुभावाचे, परस्परपोषक संबंध जोडणे, तसे करीत असताना स्वतःलाही घडविणे, स्वतःचे माणूसपण अधिक संपन्न, सुसंस्कृत व नीतिमान बनवीत राहणे यामध्ये त्याचे माणूसपण सामावलेले आहे असे त्याचे प्रतिपादन असल्याचे साररूपाने म्हणता येईल.

व्यक्तीला एक स्वतोमूल्य असते (intrinsic value), त्याचा पूर्ण आदर करून, त्याला न्याय देऊन समाजजीवनाची उभारणी करण्याबद्दल त्याचा आग्रह होता. त्याची व्यक्तिवादी भूमिका नव्हती. ती व्यक्तीच्या समूहात विलय करून टाकणारी collectivist पण नव्हती.

याचा अर्थ असा की, मार्क्सच्या मांडणीशी केंद्रीभूत, सर्वंकष राज्यसत्ता व अर्थव्यवस्था सुसंवादी ठरत नाही. मार्क्सच्या कल्पनेतील माणूसपणाच्या संवर्धनासाठी, ते मूर्त करण्यासाठी अनुरूप अशी राजकीय व आर्थिक-औद्योगिक रचना कोणची होऊ शकेल याचा विचार मार्क्सच्या मांडणीत आढळत नाही.

पण एक गोष्ट पक्की की, ती केंद्रीभूत, सर्वंकष, नोकरशाहीधिष्ठित आणि एकपक्षीय राजकीय-आर्थिक व्यवस्था असू शकणार नाही. विज्ञान-तंत्रविज्ञान, सामाजिक शास्त्रेही वेगळ्या वळणाची, वेगळी वाट चोखाळणारी असावी लागतील.

– ६ –

समाजवाद ही आधुनिकतेला पचवीत तिच्या पलीकडे जाणारी विचारप्रणाली आहे हे ओळखणे-जाणणे महत्त्वाचे आहे. तिची मांडणी अशीही करता येईल : आधुनिक कालखंडात अर्थ व काम ह्या दोन पुरुषार्थांवरच जवळपास पूर्ण भर देण्यात आलेला आढळून येतो. सत्ता व संपत्ती या दोन गोष्टींवर – म्हणजेच 'पोलिटिकल इकॉनॉमी'वर – भर होता. विज्ञान-तंत्रविज्ञानाचा विकास, मुख्यत्वेकरून, सत्ता-संपत्ती यांसाठीच केला गेला. या काळात युद्धांची संहारकता, तीव्रता व विस्तार वाढत जावा, आणि युद्ध ही उत्तरोत्तर विज्ञान-तंत्रविज्ञानाच्या 'विकासा'त, प्रगतीत अधिकाधिक महत्त्वपूर्ण योगदान करणारी गोष्ट ठरावी ही पण मग एक स्वाभाविक गोष्टच होती.

'समाजवाद' या शब्दातला 'समाज' हा शब्द मोठा अर्थपूर्ण आहे. आधुनिक कालखंडाच्या मुळाशी असलेल्या व्यक्तिवादाच्या विरोधात तो शब्द आहे. आणि अर्थ-काम यांना जे मध्यवर्ती व फाजील महत्त्व आधुनिक कालखंडात प्राप्त झाले त्यालाही विरोध दर्शविणारा हा शब्द आहे. पण 'समाज' म्हणजे 'राज्यसत्ता' नव्हे; माणसांना माणूसपण प्राप्त करून देणाऱ्या मानवीय नात्यांनी बांधल्या जाणाऱ्या समाजाला (community) येथे संदर्भ आहे. जेथे माणसाच्या व्यक्तित्वाची कदर होईल, ते जपले जाईल, त्याच्या सर्जक अभिव्यक्तीला अवकाश राहील, पण जेथे व्यक्ती ही समाजाच्या बंधनातही असेल असा समाज. आधुनिकतेच्या (Modernity) भूमिकेचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य हे की व्यक्ती तत्त्वतः स्वतःच्या इच्छा-आकांक्षा, ऊर्मी, वासना यांच्याखेरीज अन्य कशाला अंतिमतः बांधील नसते आणि राहू

अनुक्रमणिका

शकतही नाही. समाजातील इतर व्यक्तींची दखल घेणाऱ्या उपयुक्ततावादी (युटिलिटेरियन) नीतीचे, या नीतीच्या आधारे कार्यवाहीत आणलेल्या 'कायद्याच्या राज्या'चे व प्रस्थापित केलेल्या 'सुव्यवस्थे'चे बंधन व्यक्तीवर असते इतकेच. या अर्थाने ती फक्त राज्यसत्तेच्या अंकित व बंधनात असते.

राष्ट्रवादाच्या प्रणालीवर राज्यसत्तेची बांधणी, आणि इतर राष्ट्र-राज्यांच्या स्पर्धेत स्वतःच्या सत्ता-संपत्तीचा वाढ-विस्तार करण्याचे, साम्राज्यवादी-विस्तार करण्याचे आधुनिककालीन राज्यसत्तेचे उद्दिष्ट, यांचे काही स्वाभाविक व अटळ परिणाम दिसून येतात. राष्ट्रराज्याविषयी भावनिक निष्ठा जोपासण्याच्या दृष्टीने वंश, धर्म, भाषा, संस्कृती अशा विविध घटकांच्या आधारे कडवा अभिमान व गर्व जोपासणे, आक्रमक स्पर्धात्मकता व शत्रूभाव जोपासणे हा राज्यसत्तेचा जवळपास अधिकृत कार्यक्रमच बनतो. या कारणाने युद्धाच्या वा अन्य मार्गांनी इतर राष्ट्रांवर, समाजांवर मात करण्याचे, त्यांना अंकित करण्याचे व अंकित ठेवण्याचे प्रयत्न सतत चालू राहतात.

समाजवादाने युद्ध ही गोष्ट नेहमीच वर्ज्य मानलेली आहे; बंधुभाव, सहकार, शोषण-दडपणूक यांपासून मुक्ती यांच्या आधारे जगभरच्या मानवी समुदायांचे ऐक्य सर्वोच्च ध्येय म्हणून डोळ्यासमोर ठेवले आहे.

अशा रीतीने, समाजवाद हा मूलतः व भरीवपणे एक नैतिक-आध्यात्मिक विचार आहे. आध्यात्मिक या शब्दाने बिचकण्याचे कारण नाही. समाजवादाला प्राणभूत असलेली मूल्ये आणि आदर्श, ती योग्य, इष्ट व एकमेव सत्य आहेत हे वैज्ञानिक चौकटीत सिद्ध करून मग निःसंदेहपणे स्वीकारलेली नसतात. बौद्धिक तर्काने वा ऐंद्रिय अनुभवांच्या आधारे ती सिद्ध करता येत नाहीत. ही तत्त्वे, मूल्ये, आदर्श व्यक्तिगणिक वेगळी नसतात; समुदायातील, जमातीतील सर्वांसाठी ती सामायिक, निरपवाद प्रमाण असतात हा साक्षात प्रत्ययाचा भाग असतो. किंबहुना, असे सामायिक, निरपवाद प्रामाण्य ज्यांनी स्वीकृत केलेले असते त्यांचाच, त्या कारणाने एक समुदाय असतो, आणि समुदायातील सर्वांचे आपापसातील संबंध आत्मीय, पारिवारिक व एकत्वाचे असतात, ही मान्यता प्राचीन काळापासून आढळते.

मानवजातीच्या वाटचालीत एक अद्भुत घटना घडली. पृथ्वीवरील सर्व माणसे ही एकच समुदाय आहेत, त्यांच्या ठायी मानवपणाचा तोच एक अंश आहे, एकाच परमेश्वराची ती रूपे आहेत, एकाच पित्याची ती सारी लेकरे आहेत अशा वेगवेगळ्या प्रकाराने हे 'दर्शन' अभिव्यक्त झाले. 'मानवजात' (humankind) हा शब्द आपण सहजपणे वापरून बोलत असतो. पण आजही वंशविच्छेदाच्या (genocide) घटना घडतात; जे परके असतात ते शत्रू वा वध्य असंतात कारण ते परके असतात, या दृढ समजुतीमधून वर्तणूक घडत असते. या पार्श्वभूमीवर सर्व मानवांचे ऐक्य प्रतिपादन करणारे तत्त्वज्ञान, धर्मविचार हा अद्भुत व क्रांतिकारकच म्हणावयास हवा.

आधुनिक विवेकवादाची परिणती एक ना एक प्रकारच्या लिबरल, युटिलिटेरियन नीतीविचारात होते, पण तो नीतिविचार व्यक्तिवादीच राहतो. 'न्याय म्हणजे रास्तपणा' (Justice as Fairness) हे या नीतिविचाराचे उन्नत रूप होय. समाजवाद हा 'मानवमात्राचे एकत्व' या दर्शनामधून जन्म पावणारा असल्यामुळे, 'From each according to his ability to each according to his need' या तत्त्वावर त्याच्या नीतिविचाराची उभारणी आहे.

– ७ –

या नीतिविचाराला व्यवहारात साकार करणाऱ्या सामाजिक, आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक संरचना/व्यवस्था, रीतिभाती व सामाजिक संस्था कोणत्या असतील, आणि त्यांची उभारणी करण्याची रणनीती कोणती असेल, हे मग कळीचे प्रश्न ठरतात.

समाजवादाचा विचार हा खऱ्या अर्थाने आधुनिकोत्तर विचार आहे. आधुनिक कालखंडाने मानवाची क्षमता, कर्तृत्व, कौशल्ये कल्पनातीत प्रमाणात शतगुणित केली आहेत. तो वारसा पचवून वेगळी वाट पकडण्याची गोष्ट आहे.

'From each according to his ability and to each according to his needs' 'प्रत्येकाने त्याच्या उच्चतम क्षमतेनुसार समाजाला द्यावे नि प्रत्येकाने स्वतःच्या गरजेनुसार तेवढेच घ्यावे' या सूत्राचाच अर्थपूर्ण विस्तार गांधींच्या 'विश्वस्तवृत्ती' आणि 'अंत्योदय' या दोन तत्त्वांमध्ये/कल्पनांमध्ये आपणास आढळतो. या तीन तत्त्वांचा/सूत्रांचा एकत्रित विचार करावयाचा तर, उदाहरणार्थ, भारतात 'शेवटचा माणूस/समूह' कोणता व त्याच्या 'गरजा' कोणत्या यांचा विचार अग्रक्रमाने होईल. 'गरजा' आणि 'कांक्षा' ('needs' and 'wants') यांत फरक करणे गरजेचे आहे. अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण, यांच्याच परिभाषेत गरजांची मांडणी, एका

अंगाने, होईल; पण आपण समाजवादाच्या परिप्रेक्ष्यात विचार करीत असल्याने, गांधी व मार्क्स या दोघांच्याही मांडणीत उत्पादक श्रमाचे त्यांच्या त्यांच्या पद्धतीने महत्त्व सांगितले आहे. म्हणजे, शेवटच्या माणसांच्या/समुदायाच्या गरजा मानवी कर्तेपण, सर्जकता व आत्मसन्मान वृद्धिंगत करणाऱ्या उत्पादक श्रमांच्या द्वारा पूर्ण व्हायला हव्यात, त्यासाठी लागणारी उत्पादनाची साधने व नैसर्गिक संसाधने त्यांना उपलब्ध असायला हवीत, यावर भर असेल. दुसरा पैलू असा की, या गरजांच्या पूर्तीची साधने व पद्धती अशी हवीत की ज्यामुळे त्यांची पूर्तता होत असतानाच आत्मीय, माणुसकीसंपन्न चांगुलपणावर आधारलेले समुदाय बांधले जातील. ज्यांच्याजवळ ज्या क्षमता असतील त्यांनी त्यांचे योगदान इतरांच्या पूर्तीसाठी विश्वस्तवृत्तीने करावयाचे आहे.

स्वातंत्र्यानंतरच्या काळात या दिशेने दोनचार पावले टाकली गेली. शेतीच्या क्षेत्रात सामुदायिक सहकारी शेती करणाऱ्या सहकारी संस्थांची उभारणी करण्याचा एक महत्त्वाकांक्षी उपक्रम भारत सरकारच्या पुढाकाराने हाती घेतला गेला. त्या आधी कर्जाच्या विळख्यातून व्यापारी, मध्यस्थ-दलालांच्या नफेखोर लुबाडणुकीमधून शेतकऱ्यांना मुक्त करण्यासाठी ग्रामीण भागात पतपुरवठा करणाऱ्या व इतरही प्रकारच्या सहकारी संस्थांचे जाळे दाट स्वरूपात अंथरले गेले. शहरांमध्ये समाजवादी पक्षामधील — चळवळीतील कार्यकर्त्यांनी सहकारी गृहबांधणी संस्था उभारल्या, ग्राहक सहकारी भांडारे उभारली, शिक्षणसंस्थाही उभारल्या. पद्मश्री विखे-पाटील यांच्याशी सहकार्य करीत, त्यांच्या पाठीशी भक्कमपणे उभे राहात दिवंगत वैकुंठभाई मेहता, डॉ. धनंजयराव गाडगीळ आदी व्यक्तींनी विखे-पाटील यांच्या पुढारीपणाखाली अहमदनगर जिल्ह्यात लोणी (आजचे प्रवरानगर) येथे सहकारी साखर कारखाना उभारला. याच काळात धनंजयरावांनी 'को-ऑपरेटिव्ह कॉमनवेल्थ'ची कल्पना एका व्याख्यानमालेद्वारा मांडली.

पण या सगळ्यांमधून समाजवादी समाजाच्या निर्मितीच्या दिशेने जवळपास शून्य वाटचाल झाली. असे का झाले? समाजवादी समाज साकार व्हावयाचा असेल तर, अनेकानेक पातळ्यांवर व जीवनाला सर्व अंगांनी व्यापणाऱ्या लहान-मोठ्या समुदायांचे जाळे, त्यांची स्वायत्तता आणि त्याच्यामुळे आकाराला येणारा व राज्यसत्तेवरही अंकुश ठेवू शकणारा स्वायत्त नागरिक समाज यांचे पायाभूत महत्त्व भारतातील समाजवाद्यांच्या ध्यानी आलेच नव्हते. ते आधुनिकतेच्या चौकटीतले सुधारक होते. स्वातंत्र्य, समता व न्याय यांचे त्यांनी प्रमाण मानलेले अर्थ व्यक्तिवादाची पुष्टी करणारे होते; 'बूर्ज्वा' आशयच पक्का रुजविणारे होते. दुसरे कारण असे की, त्यांच्या समजानुसार, राष्ट्र-राज्य हीच आदर्श समष्टी मानणारे ते होते. भारतीय संविधानाविषयी त्यांची जी भूमिका आहे तिच्यामध्ये ही धारणा प्रतिबिंबित झालेली आढळते. भारतीय संविधान व त्याद्वारे प्रस्थापित झालेले भारतीय प्रजासत्ताक भांडवलशाही-लोकशाहीच असू शकणार. या संविधानाच्या आधारे मूलतः व प्राधान्यतः विषम व्यवस्थेमध्ये उत्पन्न होणाऱ्या केंद्रीभूत सत्ता, संपत्ती व प्रतिष्ठा यांचे 'न्याय्य वाटप' ('डिस्ट्रिब्यूटिव जस्टिस') घडवून आणण्याचे, 'कल्याणकारी राज्य' निर्माण करण्याचे उद्दिष्ट फार फार तर समोर ठेवता येते. पण ही उद्दिष्टे साध्य करण्याच्या संकल्पाचे आज काय धिंडवडे निघाले आहेत ते आपण अनुभवीत आहोत. आधुनिक राष्ट्र-राज्याची ही स्वभावप्रकृतीच आहे. मूठभरांच्या हाती सत्ता व संपत्ती यांचा संचय वाढविण्यासाठी व त्या आधारे आक्रमक विस्तारवादी-साम्राज्यवादी राजकारण करण्यासाठीच राष्ट्र-राज्याची निर्मिती झाली. तिची ही स्वभाव-प्रकृती बदलावयाची असेल तर तिचा पाया आणि तिचे आधार बदलायला लागतील.

'सहकार' नावाच्या नारायणाची मूर्ती करण्याच्या उद्दिष्टासाठी केलेल्या प्रयत्नांचे फलित नारायणाऐवजी माकड तयार होण्यात का झाले? येथील शोषित-पीडित सामान्य शेतकऱ्यांचा उद्धार करण्यासाठी स्वातंत्र्यापूर्वी, विसाव्या शतकाच्या आरंभी सरकारी पुढाकाराने व आश्रयाने सहकाराची चळवळ उत्पन्न केली. सहकार्य करण्यासाठी जे एकत्र येणार त्यांची स्वयंप्रेरणा, पुढाकार, सर्वांच्या हितासाठी स्वार्थाला मुरड घालायची तयारी, निर्बंध व पथ्ये पाळावयाची तयारी यांच्या अभावी सहकारी संस्था ही, काही एक आर्थिक सोय होते म्हणून वापरण्याची यंत्रणा केवळ ठरते. सहकारी चळवळ ही सरकारी नियंत्रणाखाली व आर्थिक आश्रयाखाली इतकी आहे की नोकरशाहीच्या तावडीत ती सापडते. सहकाराच्या नावाने स्वतःचा राजकीय व आर्थिक स्वार्थ साधण्यासाठी सहकारी संस्थेचा वापर करू इच्छिणाऱ्यांच्या पथ्यावर पडणारी ही गोष्ट आहे. त्यांच्यात आपापसात गटबाजी, सत्तास्पर्धा चालू शकते. महाराष्ट्रातल्या सहकारी साखर कारखानदारीने, एका मर्यादित अर्थाने, महाराष्ट्राचा कायापालट घडवून आणला आहे जरूर.





पण समाजवादी समाजाची बांधणी दूरच गेली आहे. हीच गोष्ट सहकारी गृहबांधणी चळवळीची. श्रमिकांच्या 'मजूर सहकारी सोसायट्या' या ठेकेदारांनीच चालविलेल्या असतात.

औपचारिकतः समाजवादी विचारप्रणालीवर बांधणी झालेल्या पक्षाच्या हाती मक्तेदारीने दीर्घकाळ सर्वंकष सत्ता राहिली तरी, राज्यसत्तेच्या जोरावर व नोकरशाहीच्या नियंत्रणाखाली समाजवादी समाज अस्तित्वात येऊ शकत नाही; स्वायत्त नागरिक शक्तीच समाजवादाला साजेसे परस्परसंबंध निर्माण करू शकते, वृद्धिंगत करू शकते; फारतर, यासाठी अनुकूल असे वातावरण निर्माण करून ते राखण्याचे, संस्थात्मक चौकटींना प्रोत्साहन देण्याचे मर्यादित पण महत्त्वाचे कार्य राज्यसत्ता करू शकते; ही गोष्ट 'केडर' पार्टीनेही जाणली पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की, स्वायत्त नागरिक शक्तीच्या आधारे जो समाजवाद साकार होईल तो भारतभर एकछाप असणार नाही. मूल्ये, ध्येये, श्रेयसाची कल्पना, 'साधारणधर्मा'ची बैठक अशा काही गोष्टी सर्वत्र आढळतील. पण त्यांचे स्थानविशिष्ट आविष्कार नवनवोन्मेषशाली राहतील. इतकेच नाही तर, सर्व स्थानिक, प्रादेशिक समाजांना समाजाचे एकच प्रारूप नमूनेदार वाटणारही नाही. 'Let hundred flowers bloom' ही भूमिका घ्यावी लागेल. तिसरी गोष्ट अशी की, प्रचंड प्रमाणावरील केंद्रीभूत उत्पादन (centralised mass production) वा केंद्रीभूत नियोजन व नियंत्रणाखाली काहीसे विखुरलेल्या स्वरूपात मोठ्या प्रमाणावरील उत्पादन व वितरण (वर्तमानकालीन अनेक बहुराष्ट्रीय कंपन्यांप्रमाणे), यासाठी जाहिरातबाजी व प्रसारमाध्यमे यांवर आधारलेली बाजारव्यवस्था ही माणसा-माणसांमध्ये मानवीय, आत्मीय संबंध प्रस्थापित होऊ न देण्यावर आधारलेली राहते. 'आम्ही एका परिवाराचे' असा मोठ्या कंपन्या आभास निर्माण करीत असल्या तरी. विज्ञान-तंत्रविज्ञानाचा 'विकास' एक वेगळा समाज निर्माण करण्यासाठी म्हणून वेगळ्या वळणाचा व दिशेने करण्याचे आव्हान झेलावे लागेल. समाजवादी जीवनशैली व संस्कृती यांना अनुरूप अशा समुदायांच्या बांधणीसाठी इष्ट व योग्य सामाजिक, आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक रीतिभाती, संस्था व रचना उभारण्याचे ज्ञान व संघटन/व्यवस्थापन कौशल्य समाजवादी कार्यकर्त्यांच्या ठायी उत्पन्न करण्याची निकड ही चौथी गोष्ट आहे.

ज्या समाजव्यवस्थेमध्ये आपण राहात असतो तिच्यात राहूनच, आपले ध्येय/आदर्श/दर्शन ध्रुवताऱ्यासारखे डोळ्यासमोर ठेवून, आपल्याला एकेक पाऊल पुढे पुढे टाकत राहायला लागणार हे उघड तथ्य आहे. केंद्रीय राज्यसत्तांचे अधिराज्य भारतात प्राचीन काळापासून आहे. पण फार मोठ्या प्रदीर्घ काळात समाजाचे व्यवहार बरेचसे स्वायत्तपणे चालत आले. दुर्दैवाने, स्वातंत्र्यानंतरच्या काळात 'न्याय्य वाटप' (डिस्ट्रिब्यूशनल जस्टिस') व 'कल्याणकारी राज्य' या दोन संकल्पनांची राबवणूक अशा प्रकारे होत आली की, लोकांची मानसिकता, संघर्ष करीत असतानाही, केंद्रीभूत राज्यसत्तेवर अधिक परावलंबी बनली आहे. हक्क, मागण्या, सवलती पदरात पाडून घेण्यासाठीची, विभिन्न योजनांखाली पैशाची तरतूद करण्यासाठीची आंदोलने यशस्वी झाली तरी लोकांच्या स्वायत्त नागरिक शक्तीत भर पडत नाही. नेते वेगवेगळ्या अर्थांनी गब्बर होतात, राज्यसत्तेचे महत्त्व व पकड वाढते. या राज्यसत्तेला 'नमविण्या'इतके आपण पॉवरफुल आहोत अशी प्रतिमा नेते लोकांच्या मनात ठसवितात. पण, काही लाभ पदरात पडल्यावरही, लोक शक्तिहीनच राहतात, परावलंबी राहतात. समाजवाद तर, मृगजळाप्रमाणे, कायम क्षितिजावरच भासमान होत राहतो.

प्रचलित लोकशाही राज्यव्यवस्था आणखी बराच काळ राहणार. कोणत्याही जातकुळीची सर्वंकष एकाधिकारवादी शाही नको, याबद्दल आपण आग्रह राखणे योग्यच आहे. आता, लोकशाही राज्यव्यवस्था जर असेल तर तिच्यासह येणाऱ्या सगळ्या गोष्टी पण येणार – सत्तासंपादनाचे राजकारण, निवडणुका, राजकीय पक्ष इत्यादी. ही केंद्रीभूत राज्यसत्ता असणार आणि 'राष्ट्रवादी' पण असणार. या राज्यसत्तेची काही कार्ये असणार, कर्तव्ये व जबाबदाऱ्या असणार, सांभाळावीत अशी पथ्ये असणार. यांच्याबद्दल आपण आग्रहही राखायला हवा. पण समाजवादाची उभारणी हे काम फार तर राज्यसत्तेच्या सहकार्याने पण राज्यसत्तेच्या जोरावर व भरवशावर नव्हे, लोकसमुदायांना-स्वायत्त राहूनच पार पाडावे लागणार आणि म्हणून लोकशाही समाजवादी राजकीय पक्षाहून स्वतंत्र, स्वायत्त अशी लोकशाही समाजवादाच्या उभारणीची चळवळ सतत जोपासत व उत्तरोत्तर अधिकाधिक सशक्त व सक्षम बनवीत राहावे लागणार आहे. ते पार पाडत जाऊ तसे लोकशाहीचे स्वरूप व तिची रचना यांमध्येही मूलग्राही बदल होत जाणार. संघर्ष अटळ आहे. पण हा संघर्ष साध्य-साधन शुचितेचे पालन करीत करण्याची सर्जकता प्रकट करायला लागेल, व संघर्षही गांधींच्या अर्थाने रचनात्मक सत्याग्रही असावा लागेल.

## २. स्वायत्त नागरिक शक्ती आणि रचनात्मक कार्यक्रम

भारतामध्ये समाजवादी विचारप्रणालींचा परिचय सोविएत रशियाच्या प्रस्थापनेनंतरच प्राधान्येकरून झाला असे म्हटले तर वावगे ठरू नये. लोकशाही विचारप्रणालीचा परिचय आपल्याला ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या द्वारा त्याआधी साठसत्तर वर्षांपूर्वी झाला होता.

भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या काळात समाजवादाच्या विचारप्रणालीवर निष्ठा ठेवणारे दोन प्रमुख प्रवाह होते. एक, साम्यवाद्यांचा व, दुसरा, लोकशाही समाजवाद्यांचा. लोकशाही समाजवाद्यांचे साम्यवादी प्रवाहापासूनचे वेगळेपण कोणत्या बाबतीत होते? तीन बाबतींत हे वेगळेपण होते : १) काँग्रेसच्या नेतृत्वाखाली लोकलढ्यांच्या मार्गाने स्वातंत्र्य संपादन करण्याला त्यांची बांधिलकी होती. महात्मा गांधींशी त्यांचे काही बाबतींत मूलभूत मतभेद होते. पण तरीही गांधींचा वैयक्तिक प्रभाव व त्यांचे लढ्याचे नेतृत्व त्यांनी मनःपूर्वक मान्य केले होते. २) सोविएत रशियातील नवसमाजाच्या उभारणीच्या प्रयोगाविषयी त्यांना आस्था होती; विशेषतः नियोजनबद्ध आर्थिक विकासाच्या प्रयोगाविषयी. पण तेथील कम्युनिस्ट पक्षाच्या सर्वंकष एकपक्षीय हुकूमशाहीला त्यांची मान्यता नव्हती. ब्रिटनमधील मजूर पक्षाचा नमूना त्यांच्या डोळ्यासमोर होता. सांसदीय लोकशाहीच्या चौकटीत राहून समाजवादी समाजाची उभारणी आपणास भारतात करायला हवी आणि तशी करता येणार आहे, अशी त्यांची पक्की धारणा होती. ३) त्यावेळी त्यांची मार्क्सवादावर ठाम निष्ठा होती. कोणत्या अर्थाने? लोकशाही मार्गाने राज्यसत्ता हाती आल्यावर, भारतातील आधुनिकपूर्व सरंजामशाही व उदग्रोन्मुख आधुनिक बूर्झ्वा भांडवलशाही यांचे उच्चाटन करून राज्यसत्तेच्या अभिक्रमाने अर्थव्यवस्थेची आमूलाग्र पुनर्रचना करण्याचा 'प्रॉजेक्ट' ते राबविणार होते. बुद्धिप्रामाण्यवाद, विज्ञान-तंत्रविज्ञान यांवर आधारित आधुनिक औद्योगिक समाजाची निर्मिती हे त्यांचे लक्ष्य होते. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी भारताच्या संदर्भात शेतीप्रधान, ग्रामाधिष्ठित रचना मोडून काढणे त्यांना आवश्यक वाटत होते. शेती, व्यापार, उद्योगधंदे या क्षेत्रांमध्ये उत्पादन-साधनांवरील खाजगी मालकी संपुष्टात आणण्याची अनिवार्य गरज त्यांनी प्रतिपादिली. शेतीचे सामुदायिकीकरण (Collectivisation), उद्योग-व्यापार व सार्वजनिक सेवांचे (उदा., रेल्वे, वीजनिर्मिती व पुरवठा, रस्ते, वित्तपुरवठा इत्यादी) राष्ट्रीयीकरण (Nationalisation) याविषयी आग्रह होता. सधन पाश्चात्त्य अर्थव्यवस्थांच्या बरोबरीने समृद्धी प्राप्त करून घेण्यासाठी नियोजनबद्ध आर्थिक-औद्योगिक विकासाचा कार्यक्रम राबविण्यासही मध्यवर्ती महत्त्व होते. याबाबतीत सोविएत रशियाचे उदाहरण डोळ्यासमोर होते.

भारतीयांच्या रोमरोमात भिनलेली आणि त्यांचे दैनंदिन जीवनव्यवहार आणि मन यांमध्ये ओतप्रोत भरून राहिलेली धर्मश्रद्धा, अंधश्रद्धा व रूढी, जातपात व स्पृश्यास्पृश्यता यांचे निर्मूलन करावयाचे होतेच. आधुनिक औद्योगिक शहरी समाजाच्या निर्मितीच्या प्रक्रियेमधून, काहीसे आपसूकच, हे उद्दिष्ट साध्य होईल अशी समज बऱ्यापैकी सार्वत्रिक होती.

मार्क्सवादी वर्गीय विश्लेषणाचा प्रभावही दिसून येतो. भारतात शेतीच्या पेशात गुंतलेल्यांचे लोकसंख्येतील प्रमाण ७५-८० टक्के इतके होते. खेड्यांमध्ये राहणाऱ्यांचे प्रमाण साधारणपणे एवढेच होते. या कारणाने स्वातंत्र्यलढ्याच्या काळात किसानसभांचे संघटन केले गेले. मोठ्या जमीनदारांविरुद्ध लढेही झाले. शेतीच्या क्षेत्रात कुळांची असुरक्षितता, त्यांचे शोषण, हा प्रश्न एक मध्यवर्ती प्रश्न होता. त्यावर लक्ष केंद्रित झाले. ते स्वाभाविकही होते. तरीदेखील, कारखानदारी उद्योगांमधील, तसेच रेल्वे, पोस्ट यांसारख्या सेवाउद्योगांमधील कामगारांना 'समाजवादी क्रांतीचे अग्रदूत' म्हणून मान्यता राहिली. जमीनमालकीहक्कांचे फेरवाटप घडवून आणणाऱ्या जमीनदारी निर्मूलन, कूळकायद्यांद्वारा कुळांना संरक्षण, 'कसेल त्याची जमीन' या तत्त्वावर जमिनीचे वाटप इत्यादी कार्यक्रमांवर भर दिला गेला. पण समाजवादी व्यवस्थेच्या उभारणीच्या संदर्भात कामगारवर्गीय ट्रेड युनियन चळवळीलाच विशेष महत्त्व दिलेले होते.

– २ –

स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या पंचावन्न वर्षांच्या अनुभवाची संगती लावण्याची, त्यापासून बोध आत्मसात करावयाची गरज आहे.

स्वातंत्र्य मिळाल्यामिळाल्या आपण राज्याची राज्यघटना बनविण्याचे काम हाती घेतले. राज्यघटनेचे वर्णन आपण लिबरल व सौम्य प्रागतिक असे करू शकू. संसदीय धाटणीची लोकशाही राज्यव्यवस्था आपण प्रस्थापित केली. वयात आलेल्या सर्व प्रौढ स्त्री-पुरुषांना समानत्वाने मताधिकार दिला. राज्यसत्तेच्या अभिक्रमाने व सर्वंकष नियंत्रणाखाली समाजवादी समाजाची उभारणी करण्याच्या दृष्टीने ही राज्यघटना कामाची नव्हती.

पण समाजवादी मूल्ये, सिद्धांत व कार्यक्रम ह्यांच्या आधारे समाजाची आमूलाग्र पुनर्घटना करण्याच्या आड येणारी ही राज्यघटना होती असेही म्हणता येत नाही. मात्र त्यासाठी केंद्र व राज्ये यांच्या विधिमंडळे-संसद या संस्थांमध्ये निर्णायक बहुमताने सातत्याने, असंदिग्धपणे समाजवादाशी एकनिष्ठ असलेले प्रतिनिधी निवडून येत राहणे ही पायाभूत व प्राथमिक शर्त होती. स्वातंत्र्य मिळाले तेव्हा भारतातील जनसामान्य विचाराने समाजवादी नव्हते; किंबहुना, स्वातंत्र्यलढ्याचा स्पर्श त्यांच्या जीवनाला झालेला असला आणि पं. नेहरू व महात्मा गांधींसारख्या नेत्यांचा प्रभाव त्यांच्यावर पडला असला तरी, समाजव्यवस्थेच्या आमूलाग्र पुनर्रचनेचा विचार त्यांनी आत्मसात केला नव्हता असेच म्हणायला लागेल.

प्रौढ मताधिकार, राजकीय पक्ष, खुल्या निवडणुका, आणि संघटना व मतस्वातंत्र्य यांच्या आधारे लोकशाही राज्यव्यवस्था कोणत्याही समाजात प्रत्यक्षात कशी काम करते याची फार अपुरी समज उच्चशिक्षित मंडळींच्या ठायी होती. लोकशाही सिद्धांतांचा पुस्तकी परिचय त्यांना होता, आणि इंग्लंडमधील लोकशाहीविषयीचे एक आदर्शीभूत चित्र त्यांच्या मनात ठसलेले होते. वस्तुतः स्वातंत्र्यापूर्वीच्या काळात लोकशाहीचा एका सीमित चौकटीतला प्रयोग आपल्या देशात १९१० पासून (मोर्ले-मिंटो घटनात्मक सुधारणांनंतरच्या काळात) चाललेला आपल्या अनुभवाचा होता. स्थानिक स्वराज्य संस्थांचाही प्रदीर्घ अनुभव जमेस होता.

कोणत्याही समाजाची, त्याच्या ऐतिहासिक वाटचालीच्या ओघात वैशिष्ट्यपूर्ण जडणघडण झालेली असते; तीमधून एक मानसिकता घडलेली असते. समाजात अनेकानेक घटकसमूह असतात, त्यांचे हितसंबंध असतात व बलाबल असते. लोकशाही व्यवस्थेत निवडणुकांच्या खुल्या, स्पर्धात्मक प्रक्रियेद्वारा सत्तासंपादनाला मध्यवर्ती महत्त्व प्राप्त होते. लोकशाहीपूर्व काळात सत्तासंपादनाच्या आखाड्यात कोण उतरू शकतो यावर बंधने असतात. प्रौढ मताधिकाराद्वारा १९५० साली आपण सर्व समाजघटकांसाठी हा आखाडा खुला केला.

'पाणी आपली पातळी गाठते' अशी आपल्याकडे म्हण आहे. सत्तासंपादनासाठी मते मिळवावी लागतात. ही मिळवून पुरेशा संख्येने आपल्या गटाचे 'लोकप्रतिनिधी' निवडून आणण्यासाठी राजकीय पक्षांचे संघटन केले जाते (वा होत जाते). यासाठी विचारप्रणाली, राजकीय-सामाजिक ध्येये, आर्थिक हितसंबंध, धर्म असे अनेक आधार घेतले जातात हा आपला अनुभव आहेच. प्रख्यात कादंबरीकार व्ही.एस. नायपॉल यांनी भारताविषयी लिहिलेल्या (अनेकांपैकी) एका पुस्तकाचा उपमथळा 'Million Mutinies Now' असा मोठा अन्वर्थक आहे. लोकशाहीच्या स्वीकारामधून सत्तेसाठी रस्सीखेच सुरू झाली, आर्थिक विकास व 'कल्याणकारी राज्य' (वेल्फेअर स्टेट) प्रस्थापनेच्या दिशेने टाकलेली दुबळी पावले यांमुळे जी घुसळण होत राहिली तिच्यामधून गेल्या अर्धशतकात भारतातील बहुतेक सर्व समाजघटकांना जाग आली आहे; पूर्वीच्या तुलनेत ते अधिक आग्रही, आक्रमक व संघटित बनले आहेत, राजकारण-समाजकारणात सक्रिय बनले आहेत, आपला प्रभाव पाडीत आहेत. ही फार मोठी, क्रांतिकारक व दूरगामी परिणाम घडवून आणणारी घडामोड आहे. भारतीय राज्यघटना सिद्ध करणाऱ्या श्रेष्ठींच्या डोळ्यासमोर लोकशाही राज्यघटना व समाज यांचे एक आदर्शवत चित्र होते. राज्यघटनेच्या राबवणुकीमधून व्यक्तिस्वातंत्र्य, समता, न्याय या मूल्यांना अभिव्यक्त करणारी न्याय्य, उदार व सत्त्वशील प्रागतिक, आधुनिक समाजव्यवस्था आकारास येईल अशी खात्रीच जवळपास त्यांनी बाळगली होती. पारंपरिक समाजात कार्यरत असलेली अनेक बंधने औपचारिकतः आज दूर केली गेली आहेत. व्यक्तिस्वातंत्र्य, व्यक्तीचे मूलभूत हक्क, नागरिक स्वातंत्र्ये, सामाजिक-आर्थिक न्याय, समता या मूल्यांच्या आधारेच, एका मूलभूत अर्थाने, गेल्या पन्नास वर्षांत मोठे बदल घडून आले आहेत. आणि तरीही, ही गोष्टही खरी की, विषमता, अन्याय, शोषण, भ्रष्टाचार, खोटेपणा, स्वार्थांधता इत्यादींची मात्रा समाजात कमी न होता वाढलीच आहे. आणि लोकशाहीच्या अंगिकाराची ही अपेक्षित अंशी एक स्वाभाविक, अटळ परिणती आहे, असेच म्हणायला हवे. या अर्थाने, भारतीय लोकशाहीने, पाणी आपली स्वतःची पातळी गाठते तशी, आपली पातळी गाठली आहे.

– ३ –

आपण आज अशा एका टप्प्यावर येऊन पोचलो आहोत जिथे आपणास अंतर्मुख होऊन, नम्रपणे काही 'सत्यां'चा ('home truths') स्वीकार करण्याची गरज आहे. लोकशाही समाजवादी समाजाची उभारणी करावयाचे ध्येय साध्य करावयाचे असेल तर, त्यासाठी, प्रथमतः, आपला समाज व आपण यांची जडणघडण कशी झालेली आहे याची अधिक सम्यक

समज प्राप्त करून घ्यावयास हवी. याचे एक साधे कारण हे आहे की, आपण मूल्यांच्या, ध्येयाच्या पातळीवर चांगली, इष्ट व आदर्श गोष्ट म्हणून 'लोकशाही'चा अंगिकार केला आहे. आपणास परिवर्तन घडवून आणावयाचे आहे खरे, पण ते जुलुमजबरदस्तीने नव्हे, तर लोकांची समज बदलून, त्यांच्या अभिक्रमाने, सहभागाने. सोविएत रशियामध्ये बोल्शेविक क्रांतीनंतरच्या काळात अवलंबिलेल्या पद्धतीने व तंत्राने आपणास नवसमाजाची उभारणी नको आहे, याची स्पष्टता हवी. प्रबोधन, हृदयपरिवर्तन, तेही अहिंसेच्या मार्गाने, घडवून आणून नवसमाजाची उभारणी करावयाची आहे, असा 'लोकशाही'च्या स्वीकाराचा अर्थ होतो. लोकशाहीच्या स्वीकारामध्ये आणखीही काही गोष्टी गर्भित आहेत. त्यांच्या त्यांच्या समजुती, रीतिभाती, संस्था, हितसंबंध, मूल्ये-ध्येये इत्यादी बाळगण्यास लोक स्वतंत्र व मोकळे आहेत. त्यांच्या आधारे राजकारण-समाजकारण करण्यास ते मोकळे आहेत. सत्तासंपादनाच्या राजकारणासाठी आकारास येणाऱ्या संघटना, पक्ष, चळवळी यांच्यामध्ये हे स्वातंत्र्य व हा सहभाग प्रतिबिंबित होतो.

लोकशाहीच्या मार्गाने कोणत्याही एका कट्टर विचार-प्रणालीवर आधारलेल्या आराखड्यानुसार समाजव्यवस्थेची एकजिनसी, एकछाप (homogeneous, uniform) उभारणी ही गोष्ट तत्त्वतः, व व्यवहारातही, अशक्यच जाणार ही गोष्ट उघड आहे. रशियामध्ये बोल्शेविक क्रांतीनंतर, एक प्रकारे, समाजवाद अमान्य असणाऱ्या घटकांची देशामधून हकालपट्टी करण्यात आली, वा त्यांना राजकीयदृष्ट्या निष्प्रभ करण्यात आले. पण ज्यांच्या निष्ठा समाजवादी-साम्यवादी होत्या अशाही सर्वांचा एकच एक पक्ष नव्हता; त्यांचेही पक्षोपपक्ष होते. सरंजामशाही व बूर्ज्वा विचारांच्या समाजघटकांना हद्दपार वा निष्प्रभ केल्यावर, समाजवादी-साम्यवादी निष्ठा बाळगणाऱ्यां-मध्येही मतामतांतरांना, पक्षांना वाव कायम राखावयाचा म्हटले असते तर बोल्शेविकांच्या हाती – जो साम्यवाद्यांमधीलही अल्पमतातला गट होता – राज्यसत्ता राहिली नसती. राज्यसत्ता आपल्या हाती राहिली तरच आपल्या कल्पनेतील आराखड्या-नुसार समाजवादी समाजाची उभारणी सत्तेच्या बळावर करता येण्याची काही खात्री बाळगता येईल, हे लक्षात आल्यावर लेनिनच्या हयातील वेगळ्या मतांच्या समाजवाद्यांचे शिरकाण-मुस्कटदाबी यांची सुरुवात झाली. पुढे तर, सर्वसत्ताधीश साम्यवादी पक्षातही विराधकांचे शिरकाण करणे अपरिहार्य बनले. लेनिनच्या सूचनेनुसार स्टालिनला १९२२-२३ साली चिटणीसपदावरून पदच्युत केले असते तरी, पुढचा इतिहास वेगळा झालाच असता याची खात्री देता येत नाही.

'मार्केट सोशालिझम'च्या आजच्या जमान्यातही, चीनचे उदाहरण उद्बोधक आहे. एकपक्षीय सर्वंकष केंद्रीभूत सत्ता तेथे कायम राखण्यात आलेली आहे. आणि साम्यवादी पक्ष आणि लोक यांच्यांतले नाते 'राजा' व 'प्रजाजन' असेच आहे. 'स्वायत्त नागरिक समाजा'चे (civil society ला) अस्तित्व व नागरिक समाजाची स्वायत्त क्रियाशीलता चिनी साम्यवादी पक्षात मंजूर करता येत नाही.

– ४ –

'लोकशाही समाजवादी' अशी स्वतःची ओळख आपण निष्ठापूर्वक देत असलो तर त्यात कोणत्या गोष्टी गर्भित आहेत?

१) ज्यांच्या निष्ठा समाजवादी नाहीत अशांनाही आपण सार्वजनिक जीवनात, सत्तेच्या राजकारणात रास्त स्वरूपाचा वाव खुला ठेवतो. त्यांचा प्रभाव वाढल्यास समाजव्यवस्थेला समाजवादी आकार प्राप्त होणे अधिक दुरापास्त बनेल ही शक्यता आपण मोकळेपणाने स्वीकारतो.

२) निवडणुकांच्या मार्गाने आपल्या पक्षाच्या हाती सत्ता आली असली तरी, तिची राबवणूक करताना आपण स्वतःहून अनेक पथ्ये पाळण्याची गरज मान्य करतो; i) राज्यसत्तेच्या व्यवहारामधून स्वायत्त नागरिक समाजाची पुष्टी व्हायला हवी, त्याचे खच्चीकरण होता कामा नये; ii) राज्यसत्तेची भूमिका दुय्यम, गौण व पूरक राहिली पाहिजे; iii) खुल्या, निष्पक्ष व स्वच्छ निवडणुकांच्या मार्गाने सत्ता गमाविण्याची तयारी ठेवली पाहिजे.

३) राज्यसत्तेचा व्यवहार योग्य व इष्ट लक्ष्मणरेषेच्या आत राहावयाचा असेल तर राज्यसत्तेवर अंकुश ठेवण्याची पात्रता व क्षमता बाळगणाऱ्या स्वायत्त नागरिक शक्तीची बांधणी व जोपासना करण्याचे कर्तव्य पार पाडावयास हवे. एरवी प्रौढ मताधिकार हे एक दुबळे, व डोळसपणे न वापरले जाणारे बोथट 'हत्यार' बनते.

राज्यसत्तेवर अंकुश ठेवण्याची शक्ती असलेला, त्यासाठी आवश्यक तो नैतिक अधिकार कमावलेला, बळ बाळगणारा,

अनुक्रमणिका

जबाबदार, क्रियाशील व संघटित स्वायत्त नागरिक समाजच लोकशाही मार्गांचा अंगिकार करून समाजवादी समाजव्यवस्थेची उभारणी करण्याचे कार्य पार पाडू शकतो ही जाण पर्याप्त स्वरूपात व प्रमाणात उत्पन्न झालेली नाही. लोकशाही समाजवाद्यांनीही नवसमाजाच्या उभारणीसाठी राज्यसत्तेवरच मदार ठेवल्याचे, तेच मुख्य व निर्णायक महत्त्वाचे साधन मानल्याचे आपणास आढळते. राज्यसत्तेच्या अभिक्रमाने व बळावर राबविल्या जाणाऱ्या 'पंचवार्षिक योजना' व विभिन्न सामाजिक-शैक्षणिक-आर्थिक धोरणे यांच्यावरच आपण विसंबून राहिलो आहोत. 'कल्याणकारी राज्या'ची (welfare state) संकल्पना दुसऱ्या महायुद्धोत्तर काळात लोकप्रिय ठरली. राज्य 'कल्याणकारी' जरी असले तरी त्याच्या कार्यवाहीमधून राज्यसत्तेचे केंद्रीकरण होते, बळ वाढते, नोकरशाहीचा पसारा वाढतो, तिची पोच व हस्तक्षेप सर्वदूर बनतो आणि लोकांचे 'प्रजाजनां'त रूपांतर होते.

आचार्य जावडेकरांनी 'सत्याग्रही समाजवादा'ची मांडणी केली. आणि स्वातंत्र्योत्तर काळात भारतातील सर्वच राजकीय पक्षांनी महात्मा गांधींच्या सत्याग्रही विचाराचा व लढ्यांचा वारसा सांगत हक्क व मागण्या पदरात पाडून घेण्यासाठी, शासकीय धोरणांना, योजनांना, व्यवहारांचा प्रतिकार करण्यासाठी, वा समाजजीवनातील दडपणूक, अन्याय, शोषण या विरुद्ध आवाज उठविण्यासाठी चळवळी व लढे या मार्गांचा अवलंब केला. गांधींना अभिप्रेत असलेली जबाबदार, कर्तव्यदक्ष, समर्थ लोकशक्ती उभारली गेल्याचा प्रत्यय आपणास येत नाही, कारण 'सत्याग्रहा'चा अर्थ बराचसा सवंग व भ्रष्ट होत गेला. तरी पण, विभिन्न मार्गांनी व स्वरूपात लोकांचा सहभाग हे भारतीय लोकशाहीचे एक महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य राहिले आहे. लोकशाही जिवंत व सशक्त राखण्यात या चळवळींचे-लढ्यांचे मौलिक योगदान राहिले आहे.

सुजाण, जबाबदार, समर्थ स्वायत्त नागरिक समाजाची उभारणी व अशा नागरिक शक्तीचा मोठा सक्रिय सहभाग याच पायावर लोकशाही समाजवादी समाजाची उभारणी करणे अनिवार्य आहे. आता, इथे दोन गोष्टी ध्यानात घ्यायला हव्यात. एक, समाजवादी समाजाच्या उभारणीचा काळ प्रदीर्घ राहणार आहे, आणि या काळात अन्य विचारसरण्या बाळगणारे लोकही समाजात सक्रिय राहणार आहेत. राज्यसत्ताही सदैव समाजवादावर निष्ठा असणाऱ्या पक्षाच्या हाती असेल असे नाही. राज्यसत्ता हाती असेल, तिची सर्वंकष पोच राहील, आणि समाजवाद आणण्यास विरोध करणाऱ्या शक्तीच समाजात कार्यरत नसतील, या भरवशावर समाजवाद साकार व्हावयाचा नाही म्हटल्यावर, अनेक विचारव्यूह व जीवनरीती, संस्कृती प्रभावी असलेल्या समाजात समाजवाद प्रत्यक्षात साकार कसा होणार, आणि कधी काळी तरी साकार होणार का?

– ५ –

समाजवादी-साम्यवादी विचारांचा इतिहास पाहिला तर एकदोन विशेष गोष्टी लक्षात येतात. एक, बूर्ज्वा भांडवलशाहीचे दिवस भरले आहेत, ती आपल्या मरणानेच संपणार आहे अशी ठाम भविष्यवाणी पुन:पुन्हा वर्तविली गेली आहे. मार्क्स-एंगल्स यांनी भांडवलशाहीचा अस्त आणि साम्यवादी व्यवस्थेचा उदय कोणत्या नियमांनुसार अटळपणे घडणार आहे हे आपण सांगत आहोत असा दावा केला. आधुनिक तंत्रविज्ञानाच्या पायावर आकारास आलेल्या भांडवलशाहीमध्ये उदयास आलेल्या औद्योगिक कामगार वर्गात समाजवादी जाणिवा उत्पन्न व्हाव्यात, तो वर्ग संघटित व्हावा, आणि तंत्रवैज्ञानिक शक्तींच्या विकासाच्या एका टप्प्यावर भांडवलशाही कालबाह्य ठरून नव्या युगाला जन्म देण्याची क्षमता व समज प्राप्त झालेल्या कामगार वर्गाच्या हाती सत्ता यावी हे ऐतिहासिक नियमांनुसार घडणारच आहे, असा या दाव्याचा एक भाग होता. 'शास्त्रीय समाजवादा'च्या ('Scientific Socialism') नावे वर्तविल्या गेलेल्या या भविष्यवाणीवर विश्वास आजही फार आढळून येतो. भांडवलशाही व्यवस्था कोंडीत सापडल्याचे दृष्य दिसले की, 'आता समाजवादी क्रांती अटळ आहे' अशी भविष्यवाणी वर्तविली जाते.

दुसरी गोष्ट अशी की, औद्योगिक कामगार वर्गाची दृढ निष्ठा समाजवादावर आहे व समाजवादाचा अवतार घडवून आणावयास हा वर्ग बद्धपरिकर आहे, हे आधारभूत गृहीतकृत्य असल्याचे आढळते. गोरगरीब पीडित-शोषितांची, दलित-आदिवासींची समाजवादाला निष्ठा असणारच, कारण त्यांच्या ऐहिक परिस्थितीमधून हीच वैचारिक जाणीव व निष्ठा त्यांच्या ठायी रुजू शकते, हे पण गृहीत धरलेले आढळते.

समाजवादी समाजाची निर्मिती 'शास्त्रीय समाजवादा'ने शोध लावलेल्या 'ऐतिहासिक नियमां'नुसार होणार आहे असे मानणे बेभरवशाचे असल्याचे '१८४८ च्या क्रांत्यां'च्या काळापासून आजपावेतो दीडशे वर्षांपेक्षाही अधिक वर्षांचा जागतिक अनुभव सांगतो. ज्या देशांमध्ये साम्यवादी पक्षांच्या राज्यसत्ता प्रस्थापित

झाल्या, व कमीअधिक काळ टिकल्या, त्या या 'नियमां'ना धाब्यावर बसवून अगदी वेगळ्या प्रक्रियेद्वारा प्रस्थापित झाल्या. आणि बोल्शेविक क्रांतीला पाऊणशे वर्षे होऊन गेल्यावरदेखील भांडवलशाही व्यवस्थेचा विस्तार व प्रभाव जगात आजच्या घडीला तरी वाढलेलाच आहे. 'उत्पादनशक्तीं'च्या विकासामधून तिचा विनाश घडणे अटळ असल्याचे दिसून आलेले नाही; उलट भांडवलशाही व्यवस्थेने पुनःपुन्हा नवसंजीवन प्राप्त करून घेण्याइतकी लवचिकता, परिवर्तनशीलता आजपावेतो प्रकट केली आहे. याचा अर्थ, भांडवलशाही ही एकमेव टिकावू, इष्ट, व शुभ व्यवस्था आहे असा होत नाही. बोध घ्यावयाचा तो हा की, समाजवादी समाजाची निर्मिती मार्क्सवादी 'ऐतिहासिक नियमां'ना अनुसरून अटळपणे घडून येण्याची शक्यता गृहीत धरणे आत्मवंचना करणारे ठरेल. किंबहुना, समाजवादी निष्ठा बाळगणाऱ्यांनी, भांडवलशाहीची सामर्थ्यस्थळे कोणची, ती नवसंजीवन का प्राप्त करून घेऊ शकलेली आहे याची समज प्राप्त करून घेण्याची आवश्यकता आहे.

दोन गोष्टी तर निर्विवाद दिसतात. कामगारवर्ग, वा शोषित-पीडितांचा, 'कष्टकऱ्यां'चा वर्ग हा समाजवादी समाज प्रस्थापित करण्यास बद्धपरिकर असतो, त्याच्या निष्ठा समाजवादी असतात ही समजूत भ्रामक आहे, ही एक गोष्ट. दुसरी गोष्ट अशी की, लोकशाही मार्गाने समाजवादाची उभारणी व्हावयाची असेल तर, समाजवादाची अनिवार्यता, इष्टता व सरसता यांना विभिन्न समाजघटकांमध्ये व्यापक व भक्कम पाठिंबा मिळावयास हवा, आणि त्यांचा मनःपूर्वक सहभागही समाजवादाच्या उभारणीमध्ये राहावयास हवा.

येथे इंग्लंडचा अनुभव उद्‌बोधक आहे. तेथील मजूर पक्ष समाजवादी विचारप्रणालीवर पक्का विश्वास ठेवणारा होता. कामगार संघटना हा त्या पक्षाचा कणा होता. इंग्लंडमध्ये मार्क्सवादामध्ये अभिप्रेत असलेली समाजाची वर्गीय विभागणी ठळकपणे नजरेस पडत होती. गेली किमान पाऊणशे वर्षे तरी मजूर पक्ष हा ब्रिटनमधील द्विपक्षीय सांसदीय व्यवस्थेमधील एक मुख्य पक्ष राहिला आहे. त्याच्या हाती दुसऱ्या महायुद्धानंतर दीर्घकाळ सत्ता पण राहिली. स्थूलमानाने आपणास असे आढळते की, मजूर पक्षाच्या कारकीर्दीमुळे मजूर पक्षाचा कणा असलेल्या कामगारवर्गीय व मध्यमवर्गीय बुद्धिजीवी समाजघटकांच्या समाजवादी निष्ठा अधिक बळकट झाल्या, समाजवादाची सरसता व शुभप्रदता प्रत्ययास आल्याने अन्य समाजघटकांकडून समाजवादी उभारणीस व्यापक पाठिंबा मिळाला असे घडले नाही. आजची परिस्थिती अशी की, पंतप्रधान टोनी ब्लेअर यांच्या नेतृत्वाखालील मजूर पक्षाचे वर्णन, 'समाजवादाच्या उभारणीला बांधील असलेला पक्ष' या शब्दांत करणे अवघडच आहे.

– ५ –

येथेच आपणासमोर थेट मूळाशी वा गाभ्याशी जाऊन भिडणारा एक प्रश्न दत्त म्हणून उभा ठाकतो. त्या त्या काळी जे आर्थिकदृष्ट्या शोषित-पीडित व गरीब असतात त्यांची आर्थिक भरभराट घडवून आणण्यावर शक्ती एकवटणारी समाजवाद ही एक आर्थिक विचारप्रणाली आहे का? मूळात समाजवादाचा विचार जन्माला आला त्यामागील प्रेरणा केवळ आर्थिक नव्हत्या. पण औद्योगिक कामगारवर्गीय संघटनांना वैधता, स्थैर्य व मजबुती प्राप्त झाली, त्यांच्या पाठिंब्यावर समर्थ राजकीय पक्ष उभे राहिले, आणि लोकशाही व्यवस्था युरोपात प्रस्थापित झाल्या, तसे समाजवादी विचारप्रणालीचे रूपांतर प्राधान्येकरून आर्थिक विचारप्रणालीमध्ये झाले. युरोपीय समाजांना औद्योगिक क्रांतिपूर्व काळात एक तीव्र व साचेबंद स्वरूपाच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक विषमतेची पार्श्वभूमी होती. बूर्ज्वा भांडवलशाहीने सरंजामशाहीची चौकट मोडली. पारंपरिक खानदानी श्रीमंत मालकवर्गाच्या जोडीला स्वतःची अभिक्रमशीलता, उद्योजकता आणि कर्तृत्व यांच्या जोरावर उत्कर्ष पावलेल्या भांडवलदार वर्गाची भर पडली. समाजव्यवस्थेची ठेवण विषमताधिष्ठितच राहिली. विषमतेचे मान औद्योगिक क्रांतीच्या नंतर ठळकपणे वाढलेच. पण औद्योगिक कामगारवर्गाच्या जीवनमानात उत्तरोत्तर सुधारणा होत गेली. कामगारवर्गातही एक कुशल कामगारांचा व्यावसायिक 'खानदानी'वर्ग आकाराला आला. भांडवलशाहीच्या युगात अधूनमधून बसणाऱ्या मंदीच्या तडाख्यांचे संकट खरे खोलवर आघात करणारे. १९२९ च्या त्या प्रचंड मंदीच्या आघातापुढे भांडवलशाहीचा अंतकाळ जवळ आल्याची काही काळ खात्रीच पटल्यासारखी झाली, आणि लोकशाही समाजवादी पक्षांना व्यापक पाठिंबा प्राप्त झाला. पण त्याचा एक परिणाम असा झाला की, आर्थिक विषमतेचे मान कमी करणाऱ्या, कोणी बेरोजगार राहू नये आणि, बेरोजगार रहावेच लागले तर, किमान जगण्यासाठी पुरेसा बेकारभत्ता दिला जावा अशी अर्थव्यवस्था उभी करण्यावर भर देणाऱ्या आर्थिक प्रणालीमध्ये समाजवादाचे रूपांतर झाले.

खाजगी मालकीच्या जागी उत्पादनसाधनांवर व मोक्याच्या आर्थिक-व्यापारी व्यवहारांवर सार्वजनिक मालकी व नियंत्रण प्रस्थापित केल्यास विषमता मोठ्या प्रमाणात कमी करता येईल अशी धारणा मजूर पक्षाच्या नेतृत्वाच्या ठायी बरीच ठाम होती. लोकशाहीची चौकट स्वीकारलेली असल्यामुळे, राष्ट्रीयीकरणाचे धोरण राबवून अर्थव्यवस्थेतील 'मोक्याच्या जागां'वर शासकीय प्रभुत्व स्थापित करणारे 'सार्वजनिक' मालकीच्या उद्योग-सेवा यांचे क्षेत्र निर्माण करण्याचे धोरण राबविल्यानंतरही, अर्थव्यवस्था भांडवलशाही वळणाचीच टिकून राहिली. राष्ट्रीयीकृत उद्योग व सेवाव्यवसाय चालविणारी नोकरशाही खास लिबरल-व्यक्तिवादी व स्वतःच्या स्वार्थी हितसंबंधांना जपणारी राहिल्याने, तसेच कामगारवर्गाचाही भर आर्थिक भरभराट साधण्यावर राहिल्याने, समाजवादाचे स्वप्नही कालांतराने विरून गेल्यासारखे झाले. याच काळात साम्यवादी रशियाची वाटचाल समाजवादी मूल्यांचा व ध्येयांचा खातमा करण्याच्या दिशेने होत गेल्याने, काहीशा जुलुमजबर-दस्तीने पण विशेष जलदगतीने औद्योगिक-आर्थिक व लष्करी 'विकास' साधण्याचा 'राजमार्ग' म्हणून रशियाचा नमूना जगभरच्या विकसनशील व मागास नवस्वतंत्र देशांनी स्वतःच्या डोळ्यासमोर ठेवला. या पार्श्वभूमीवर समाजवादाचा आशय आपण काय मानतो, कशाला मध्यवर्ती महत्त्व देतो, हा मुद्दा कळीचा बनतो.

मूलतः मनुष्य ही सुटी व स्वायत्त व्यक्ती असते; स्वतःच्या सुखाची वृद्धी — सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा, कीर्ती इत्यादी गोष्टी सुखसमृद्धीची साधनेच असतात — करण्यासाठी अविरत प्रयत्न व्यक्ती अनिवार्यपणे करत असते, तसा प्रयत्न हाच मानवी व्यक्ती म्हणून तिचा भोग असतो; आणि म्हणून जगातल्या इतर व्यक्तींशी (व अन्य सजीवांशीही) व्यक्तीचा संबंध स्वतःचा फायदा करून घेण्याच्या उद्देशाने सोयीपुरता, 'भाडोत्री'/'कंत्राटी' असतो; संबंधांना जे 'आत्मीय', भावनिक, 'मूल्य'वान रूप असते ते, एकतर, पारंपरिक संस्कार व रीतीभातींचे अवशेष या स्वरूपाचे असते आणि/किंवा तो वरवरचा आकर्षक मुलामा असतो; — सरंजामशाहीचा भेद करून जी आधुनिकयुगीन समाज-व्यवस्था व संस्कृती उत्कर्ष पावली तिचा हा सैद्धांतिक पाया होता (व आजपावेतो तो कायम आहे). अठराव्या शतकाच्या उत्तरार्धानंतर 'औद्योगिक क्रांती' उत्कर्ष पावली आणि ठळकपणे एक नवीच अर्थव्यवस्था आकारास आली. तिचे 'अर्थशास्त्र' रचणाऱ्यांमध्ये ॲडम स्मिथचा मोठा वाटा राहिला. नेपोलियनच्या पाडावानंतर इंग्लंड जगातील अव्वल आर्थिक सत्ता बनली आणि एक नवी, कमालीचा झपाटा असलेली, जोमदार कारखानदारी व्यवस्था प्रस्थापित झाली. या नव्या व्यवस्थेने नफेखोरीपोटी मानवी संबंधांची निर्घृणपणे मोडतोड केली आणि निसर्गसृष्टीलाही विद्रूप करून टाकण्याचा उद्योग आरंभिला. अनेकानेक संवेदनशील व्यक्तींना असे अनुभवास आले की, सत्ता-संपत्तीच्या लोभापोटी माणसे स्वतःचे व इतरांचेही माणूसपण खच्ची करीत आहेत. विशेषतः गोरगरीब, शोषित-पीडित-वंचित श्रमिक वर्गाचे माणूसपण. या घडामोडींना कळवळून, पोटतिडिकेने, नैतिक संतापाने ज्यांची तीव्र व उत्कट प्रतिक्रिया झाली त्यांनी माणसामाणसांमधील आत्मीयतेचे, बंधुभावाचे, समता व न्यायाचे (righteous) संबंध व त्यांचे महत्त्व ठसविणाऱ्या, माणसांना माणुसकीसंपन्न बनविणाऱ्या, आणि या अर्थाने 'साम्यवादी'/'समाजवादी' विचारप्रणालींना जन्म दिला. या अंगाने पाहिल्यास साम्यवाद-समाजवाद ही व्यक्तित्वाचा लोप करू पाहणारी समूहवादी (collectivist) विचारप्रणाली नाही. बंधुभाव, परस्परसहकार्य, सेवाभाव, समता व मानवामात्राचे ऐक्य यांच्या आधारे प्रत्येक माणसामधील माणुसकीचा परिपोष करीत त्याला उच्च नैतिक, सात्त्विक-सुंदर असे स्वायत्त, स्वतंत्र, मुक्त व्यक्तित्व प्राप्त करून देण्याचे स्वप्न (Utopia) बाळगणारी ती विचारप्रणाली आहे.

समाजवाद-साम्यवाद या विचारप्रणालीचा पाश्चिमात्य समाजांमध्ये एका विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीत व कारण-परंपरेने विकास झाला. यामुळे या विचारप्रणालीमध्ये भर राज्यसत्तेच्या केंद्रीकरणावर राहिला. राज्यसत्तेच्या सर्वंकष नियंत्रणाखाली समाजाचे सर्व व्यवहार आणून न्याय आणि समता प्रस्थापित करण्याचे उद्दिष्ट साध्य करावयाचे होते. विज्ञान-तंत्रज्ञानाच्या शक्तींच्या — उत्पादनशक्तींच्या — सहाय्याने वस्तू व सेवा यांचे कमालीचे वैपुल्य निर्माण करण्यानेच हे उद्दिष्ट साध्य करणे माणसाच्या आवाक्यात येणार आहे अशी पक्की धारणा आढळते. ही भूमिका दृढ होण्यामागे मार्क्स-एंगल्सप्रणीत 'शास्त्रीय-समाजवादा'च्या मांडणीच्या प्रतिष्ठेचा व रशियातील बोल्शेविक क्रांतीच्या घटनेचा मोठा वाटा होता.

— ७ —

खुद्द मार्क्सच्या विचाराच्या गाभ्याशी दोन गोष्टी आढळतात. त्यांची दखल घ्यावयाची म्हटले तर साम्यवाद-समाजवादाचा



अनुक्रमणिका

आशय व भर यामध्ये ठळक फरक पडतो. माणूस हा स्वभावतः निर्माता व कर्ता आहे; माणसांच्या समुदायामध्ये, परस्परांचे पोषण करणाऱ्या, परस्परांना आधार देणाऱ्या, परस्परांच्या उपयोगाच्या वस्तू परस्परांसाठी उत्पादन करणाऱ्या आत्मीय संबंधांतून त्याला त्याचे माणूसपण प्राप्त होते. त्याच्या या प्राणभूत निर्मितीक्षमतेचे क्षपण (reduction) 'श्रमशक्ती'त करून, त्या श्रमशक्तीलाही एक विक्रेय वस्तू बनवून, ती दुसऱ्याला — भांडवलदारमालकाला — विकूनच उदरनिर्वाह करण्याखेरीज गत्यंतर न ठेवून, उत्पादनसाधनांपासून त्याला वंचित करून त्याला केवळ 'श्रमिक' बनविले जाते. त्याच्या निर्मितीक्षमतेला व त्याने निर्माण केलेल्या वस्तूला केवळ एक विक्रेयवस्तूचे (commodity) रूप प्राप्त करून दिले जाते तेव्हा माणूस स्वतःच्या माणूसपणाला पारखा (alienate) होतो, हा मार्क्सचा कळीचा मुद्दा होता. 'राज्यसत्तेचा विलय' हा (withering away of the state) हा असाच दुसरा कळीचा मुद्दा. मार्क्स हा मुद्दा करतो याचा अर्थ काय? माणसामाणसांमधील संबंध सहकार्याचे, परोपकाराचे, बंधुभावाचे, आत्मीयतेने ओतप्रोत बनले तर बळाच्या, जुलुमजबरदस्तीच्या मार्गाने लोकांना दाबात व दडपून ठेवून कार्यभाग साधणाऱ्या राज्यसत्तेची गरज उरणार नाही; परस्परसमजुतीने कारभार चालेल तर 'बडग्याचा धाक घालणाऱ्या राज्यसत्तेच्या यंत्रणे' (coercive apparatus of the state) शिवायच कारभार चालेल, असे मार्क्सचे म्हणणे.

व्यक्ती सुट्या सुट्या असतात; स्वतःच्या सुखोपभोगात सतत वाढ करीत राहण्याची अविरत धडपड करणे हीच मनुष्यस्वभावप्रकृती आहे; या बुद्धिप्रामाण्यवादी तत्त्वज्ञानावर उभारलेल्या स्वार्थकेंद्री, व्यक्तिवादी पायावर उभारल्या गेलेल्या आधुनिक समाजात व्यक्तिस्वातंत्र्य, न्याय, समता या तत्त्वांनाही व्यक्तिवादी आक्रमक आशय प्राप्त होतो. अशा समाजाची धारणा, एका अंगाने, बूर्झ्वा भांडवलशाही लोकशाही व्यवस्थेचे रूप धारण करते तर त्याचवेळी, दुसऱ्या अंगाने, ती सर्वदूर पोच व हस्तक्षेप असलेल्या केंद्रीभूत राज्यसत्तेचे रूप धारण करते. जागतिकीकरणाच्या वर्तमान कालखंडात, एका बाजूला, खुल्या, अनिर्बंध, मुक्त आर्थिक व्यवहारांचा आग्रह धरला जात आहे, राष्ट्र-राज्यांचे सार्वभौमत्व खिळखिळे बनत आहे. पण, त्याचवेळी, जगात राजकीय व आर्थिक सत्तेचे केंद्रीकरणही अटळपणे घडून येत आहे. या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत.

आपण असेही पाहिले की, समाजवाद ही समूहनिष्ठ (collectivist) विचारप्रणाली नाही; तसेच ती व्यक्तिवादी विचारप्रणालीपण नाही. मानवी समुदायामध्ये — कुटुंब, गणगोत, गाव, जात/जमात अशा विविध रूपांतील समुदायांमध्ये — माणसाला माणूसपण प्राप्त होते, आणि म्हणून माणसाला चांगले, सत्त्वशील, उन्नत नैतिक व्यक्तित्व प्राप्त होण्यासाठी समुदाय व व्यक्ती या दोहोंची कल्पना करावी लागते, बांधणी करावी लागते. समुदाय व व्यक्ती (Community and Individual) या दोहोंच्या गाभ्याशी आत्मीय नाती असतात आणि खोलवर रुजलेल्या अशा नात्यांमुळेच समुदाय व व्यक्ती यांचे अस्तित्व शक्य होते. नाती उन्नत, शुभप्रद, आत्मीय बनण्यासाठी व तशी ती टिकून राहण्यासाठी समाज विषम, अन्याय्य, शोषणाधिष्ठित नसावा ही पायाभूत आवश्यक गोष्ट आहे. कारण अशा समाजात सहकार, सेवा, परोपकार, बंधुभाव, प्रेम या मूल्यांची धूप होते. माणसातला चांगुलपणा, माणुसकी यांचे मूल स्रोत या मूल्यांवर उभारलेल्या सामूहिक व वैयक्तिक जीवनातच असतात. ही मूल्ये व यांवर आधारित नाती, त्यांचा परिपोष करणारी राजकीय, सामाजिक व आर्थिक व्यवस्था, रीतिभाती, संस्थात्मक रचना आणि संस्कृती समाजवादाचा आशय व आकार स्पष्ट करतात.

मार्क्सने माणसाचे कर्तेपण, त्याची निर्मितीक्षमता आणि स्वतःच्या निर्मितीद्वारा इतरांशी तो जोडतो ते संबंध ह्यांवर भर दिला. माणसातल्या सज्जनतेचा, चांगुलपणाचा (Goodness, Righteousness) स्रोत कोणता, हा प्रश्न त्याने सरळसरळ उपस्थित केला नाही. (तो पुढे आपल्या देशात जयप्रकाशांनी १९५० च्या दशकात उपस्थित केला.) हा प्रश्न उपस्थित केला की, विचारांना एक वेगळाच आयाम प्राप्त होतो. ज्यांना आपण साधुसंत म्हणून ओळखतो अशांच्या शिकवणुकीमधून व जीवनसरणीमधून या आयामाचे सुस्पष्ट दर्शन आपल्याला घडते. मार्क्सचे कौटुंबिक जीवन पाहिले तर त्यात या आयामाचे दर्शन आपल्याला होते.

– ८ –

लोकशाही मार्गाने भारतात समाजवादी समाजाची उभारणी कशी करावयाची? राजकीय शक्ती निर्माण करून, केवळ निवडणुका लढवून, राज्यांमध्ये व केंद्रामध्ये सत्ता हाती घेऊन नव्हे. सत्तेचं राजकारण हे पाप आहे, घाणेरडं काम आहे, या

अनुक्रमणिका







भूमिकेतून वरचा नकार आलेला नाही. सांसदीय लोकशाही आपण स्वीकारली आहे, तर राजकीय पक्ष, सत्ता संपादनाचे राजकारण, निवडणुका, सत्ता हाती घेऊन राज्य चालविणे-उपभोगणे या सर्व गोष्टी असणारच. सत्तेचे आकर्षण असणारे समजात पुरेसे लोक असल्याने, पक्ष स्थापन करून सत्तेचा वापर करणारे पक्ष स्थापन होतीलच. पण आजची समाजव्यवस्था व विभिन्न घटकांचे बलाबल लक्षात घेता, समाजवादी समाजाच्या उभारणीची गोष्ट साध्य होणार नाही. गेल्या पन्नास वर्षांचा अनुभव आपल्या जमेला आहेच. तो आपणास काय सांगतो? समाजवादाच्या उभारणीच्या दृष्टीने १९४७ ते १९६५ या काळातली पं. नेहरूंच्या नेतृत्वाखालची काँग्रेसी सरकारे अनुकूल असतानाही, सनदी प्रशासकांच्या तरुण पिढीचा प्रामाणिक उत्साह व साथ असूनही, 'लँड रिफॉर्म्स' विषयक कायद्यांची, सहकारी शेतीच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी चोखपणे होऊ शकली नाही. सावकार-व्यापारी यांच्या शोषक विळख्यातून भारतातील शेतकऱ्यांची सोडवणूक करण्याचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून भारतभर सहकारी पतपेढ्या, विविध कार्यकारी सहकारी सोसायट्या, सहकारी प्रक्रिया उद्योग, सहकारी बँका यांची उभारणी शासकीय खात्यांच्या मार्गदर्शन व नियंत्रणाखाली मोठ्या आशेने व उत्साहाने झाली. त्यांच्या कार्यामुळे मोठे आर्थिक-सामाजिक परिवर्तन घडूनही आले. पण या परिवर्तनामधून समाजवादी समाजाच्या दिशेने ठोस पावले पडल्याचे, तुरळक सन्माननीय अपवाद सोडल्यास, अनुभवास येत नाही. कामगार/ सरकारी कर्मचारी, अधिकारी यांच्या संघटनांचा कमालीचा विस्तार झाला. त्यांना स्थैर्य, भक्कमपणा व बळ प्राप्त झाले. कायदेही अनुकूल होते. या सगळ्यांचा समाजवादी समाजाच्या उभारणीच्या साठी विशेष लाभ झालेला नाही. संघटित औद्योगिक क्षेत्र, शासकीय व निम-शासकीय उद्योग, नोकरशाही इत्यादी क्षेत्रांमध्ये जागृत व संघटित झालेला, सापेक्षतः सुस्थितीतला कामगार-कर्मचारी-अधिकारी वर्ग हा समाजवादी समाजाच्या भारतातील उभारणीच्या मार्गातली एक मोठा अडसर आहे, असेच आज म्हणायला लागेल. भारतातील श्रीमंत भांडवलदार, जमीनदार, व्यापारी वर्ग हा अजूनही अल्पसंख्यक आहे. भारतातील मध्यमवर्ग — या वर्गात संघटित क्षेत्रातले कामगार व कर्मचारी पण समाविष्ट आहेत — जर दृढपणे समाजवादी निष्ठा बाळगणारा झाला तर श्रीमंत वर्गाची ताकद समाजवादाची घोडदौड रोखण्यास पुरी पडणार नाही. पण हा वर्ग व्यक्तिवादी बूर्झ्वा मनोवृत्ती व व्यवहार विशेषच आग्रहाने प्रकट करणारा आहे. आणि आपणास परिचित असलेल्या लोकशाही समाजव्यवस्थेत असे घडणे स्वाभाविक व अटळ आहे.

सारांश, लोकशाही व्यवस्थेतील राज्यसत्तेच्या भरवशावर विसंबून समाजवादाचे स्वप्न साकार होणार नाही. याचा अर्थ, नक्षलवाद्यांच्या मार्गाने सशस्त्र क्रांतीद्वारा राज्यसत्ता काबीज करून समाजवाद आणता येईल असा नाही; तो मार्ग तर पुरता बाद असल्याचे पुरेसे स्पष्ट झाले आहे.

लोकशाही मूल्यांशी, कार्यपद्धतीशी आणि संस्कृतीशी संवादी स्वरूपाच्या समाजवादाची उभारणी स्वायत्त नागरिक समाजाच्या विधायक रचनात्मक पुरुषार्थामधूनच मुख्यत्वेकरून होऊ शकते. म्हणजेच 'कल्याणकारी राज्या'चा नमूना डोळ्यासमोर ठेवून उपयोगी नाही. रचनात्मक पुरुषार्थाच्या जोरावर स्वतंत्रपणे व स्वायत्तपणे उभारलेल्या स्वराज्यात्मक संरचनेचा नमूना डोळ्यासमोर ठेवायला हवा. 'सत्याग्रही समाजवाद' या आचार्य जावडेकरांच्या मांडणीला या दृष्टीने अर्थपूर्णता व महत्त्व आहे. सत्याग्रही लोकशक्ती ही केवळ संघर्षांच्या, लढ्यांच्या मार्गाने राज्यसत्तेवर अंकुश ठेवणारी नसते; राज्यसत्तेवर अंकुश ठेवण्या-साठीदेखील, गांधींच्या सत्याग्रही भूमिकेनुसार, नागरिक समाजाने रचनात्मक कार्याद्वारे आपली शक्ती उत्पन्न केली पाहिजे व कर्तव्यदक्ष जबाबदार नागरिकांची भूमिका पार पाडली पाहिजे.

भारतीय समाजाचे आजचे चित्र पाहिले तर, ठळकपणे, काही गोष्टी समोर येतात. आजही देशात लोक सर्वात जास्त संख्येने शेतीवर अवलंबून आहेत. शिक्षण, घरे, आरोग्य, पिण्याचे पाणी, जळण अशा अनेक पायाभूत गरजांच्या बाबतीत समाधानकारक पुरवठा ज्यांना उपलब्ध नाही अशांचे खेडी व शहरे यांमधील प्रमाण (व संख्याही) खूप मोठे आहे. मोठ्या अभिमानाने असे सांगितले जाते की, हरित क्रांतीच्या यशामुळे देशात अन्नधान्याचे मोठे साठे गोदामांमध्ये आहेत. पण आजही रोजगार नाही आणि म्हणून बाजारातले अन्नधान्य विकत घेण्याची ऐपत नाही या कारणाने ज्यांना रोज पोटभर अन्न मिळत नाही अशा लोकांची संख्याही मोठी आहे. अंगभर कपडे व अंथरुण-पांघरूण या बाबतीतही वंचितांची संख्या मोठी निघेल.

असेही दिसते की, आजच्या नमुन्याचा, अत्याधुनिक तंत्रविद्येच्या आधारे साधला जाणारा विकास भविष्यात भारतातील सर्वांपर्यंत पोचणारच नाही. बहुधा निम्मी लोकसंख्या विकसित व संघटित व्यवस्थेच्या बाहेर ढकलली जाईल, आणि जंगल,





जमीन, पाणी, यांसारखी त्यांना जगण्यासाठी आवश्यक संसाधनेही त्यांच्यापासून हिसकावून घेतली जातील. राज्यसत्ता यांची जबाबदारी नावापुरतीच येईल; त्यांच्या वाट्याला भिकाऱ्यांचे 'दयेवर जगणे' येईल.

स्वायत्त नागरिक समाजाची शक्तिशाली बांधणी आणि समाजवादी समाजाची उभारणी या वंचित, पीडित, उपेक्षित लोकांमधील रचनात्मक पुरुषार्थ जागा करून करता येईल. ही अत्यंत आश्वासक प्रक्रिया ठरेल. आपले मोठे भाग्य असे आहे की, 'कल्याणकारी राज्या'च्या मोठ्या विस्तारानंतरही आणि चाळीस वर्षांच्या विकास प्रक्रियेच्या सर्वग्रासी व सर्वव्यापी हस्तक्षेपानंतरही लोकजीवन व व्यवहाराचे मोठे क्षेत्र अजून लोकांच्या भरवशावरच चाललेले आहे. अगदी तळागाळाच्या लोकांसाठी ज्या विविध शासकीय योजना आहेत त्या त्यांना आश्रित, परावलंबी व लाचार ठेवू इच्छितात; त्या त्या वेळी सत्तेवर असलेला पक्ष उदार उपकारकर्त्याची भूमिका वठवू पाहतो.

अलिकडच्या काळात गरीब, शोषित, दलित, वंचित अशा ग्रामीण व शहरी लोकांच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्यासाठी त्यांच्यामध्ये हक्कांविषयी जागृती उत्पन्न करून, त्यांचे संघटन करून त्यांच्या मागण्यांच्या भोवती लढे उभे करणाऱ्या, विकासकार्य करणाऱ्या अनेकानेक स्वयंसेवी संघटना देशभर क्रियाशील आहेत. त्यांची नीट गणती केली तर हजारोंची संख्या भरेल. यापैकी अनेकांना देशी-विदेशी निधीवाटप करणाऱ्या संस्थांची मदत मिळते (फंडिंग एजन्सीज). राज्य व केंद्र शासनाच्या विभिन्न खात्यांनी हाती घेतलेल्या नाना योजनांच्या अंतर्गत अनेक स्वयंसेवी संस्थांना (एन.जी.ओ.ना) अनुदानेही मिळतात. या स्वयंसेवी संस्थांकरवी अनेक ठिकाणी मोलाचे, भरीव उपयोगी कार्य पार पडत आहे. पण या प्रकारचे असे चांगले, उपयोगी कार्य एका नव्या लोकाधिष्ठित, स्वाश्रयी समाजवादी समाजाच्या उभारणीत परिणत पावत आहे असे जवळपास कोठेच अनुभवाला येत नाही. विशिष्ट 'लाभार्थी' समाजघटकांच्या भौतिक स्थितीमध्ये सुधारणा घडवून आणण्यामध्ये, मागण्या पदरात पाडून घेण्याच्या दृष्टीने संघटित बळ उत्पन्न करण्यामध्ये कमीअधिक यश स्वयंसेवी संस्था/संघटना यांना येताना दिसते.

याची कारणे कोणती आढळतात? काही ठळक कारणांवर बोट ठेवता येईल. १) ज्या लोकांमध्ये व क्षेत्रांमध्ये कामे चालतात त्या लोकांमधून/क्षेत्रांमधून कामांसाठी लागणारा पैसा सहसा येत नाही; पैशाचा स्रोत बाहेरचा असतो. २) केवळ पैसा बाहेरून येतो असे नाही. योजना, कामांचे आराखडे, कार्यपद्धती, प्रमुख कार्यकर्ते, कामामागची विचारप्रणाली अशा सर्व मोक्याच्या गोष्टी बाहेरून आयात केलेल्या असतात. ३) ज्यांना कामे करावयाची असतील त्यांनी पैसा आणि योजना आणाव्यात, मुख्य कार्यकर्ते व यंत्रणा आयात करावी, काही स्थानिक व्यक्तींनाही सामील करून घ्यावे, व विविध लाभ आमच्या पदरात टाकावेत अशी मानसिकता सर्वत्र जोपासली गेली असल्याचे आढळते. हे लाभ मिळण्याची आणि परिस्थिती पालटण्याची चौकट व्यक्तिवादीच (फारतर कौटुंबिक) राहते. विकासाच्या कामांमधून किंवा संघर्षात्मक लढ्यांमधून ज्या संस्था/संघटना उभ्या राहतात त्याही राज्यसत्तेचे मध्यवर्तीपण टिकवून ठेवतात; तसेच, समाजवादी संबंध, व्यूह, जीवनशैली यांना आकार देणाऱ्या रीतिभाती यांची त्या बांधणी करताना दिसत नाहीत. शासकीय अभिक्रमाने व राज्यसत्तेच्या बळावरच व्यापक व मूलगामी पुनर्रचना शक्य आहे, ही कार्यकर्ते व संस्था/संघटना यांची यामागील धारणा असल्याचे जाणवते.

– ९ –

आता, एका वेगळ्याच कोनामधून विचार करूया. भारतातील लोकांची मनोधारणा व व्यवहार यांचा वैशिष्ट्यपूर्ण आकृतिबंध कोणता आहे? मनोधारणा व व्यवहार यांच्या अंगाने पाहिल्यास जात-जमात ही मध्यवर्ती संस्था असल्याचे लक्षात येते. भारतातील खेडेगावदेखील प्राचीन काळापासुन — म्हणजे किमान साडेतीन-चार हजार वर्षांपासून — एका विशाल नागर समाजाचा घटक म्हणूनच अस्तित्वात आहे. कोठलेही मोठे गाव घेतले तर अनेक जातींच्या मिळून साकारलेल्या एका गुंतागुंतीच्या संरचनेमधून गावाची 'एकात्मता' प्रस्थापित केलेली आढळते. जात आणि गावकी ('गावगाडा') या दोन मध्यवर्ती संस्था आढळतात. शहरे घेतली तरी याच दोन संस्था मध्यवर्ती असल्याचे दिसते. त्यांचा चेहरामोहरा थोडा वेगळा होई, एवढेच. वरच्या स्तरावर एक ना एक प्रकारची राज्यसत्ता असे.

व्यक्ती कुटुंबात, कुटुंब गणगोत व जात/जमातीत, आणि गणगोत हे गावकीत पण, अशी ही पायाभूत व्यवस्था विषम, उच्चनीचता व स्पृशास्पृश्यता यांनी ग्रस्त व कलंकित होती.

धर्म ही एक मध्यवर्ती महत्त्वाची संकल्पना आहे. इस्लाम धर्म, ख्रिश्चन धर्म, हिंदू धर्म यामध्ये धर्म हा शब्द ज्या अर्थाने वापरला जातो तो अर्थ अगदी वेगळा आहे हे ध्यानात घ्यायला

हवे. स्वधर्म, परधर्म, ज्ञातिधर्म, क्षत्रियाचा धर्म, पतीचा धर्म इत्यादी शब्दप्रयोगांमधून सूचित व अभिव्यक्त होणारा अर्थ येथे महत्त्वाचा आहे. ही एक लवचिक, गतिमान व व्यामिश्र संकल्पना आहे. आपण धर्मयुद्धाची पण गोष्ट करतो. म्हणजे, व्यवसायपेशा, समूहजीवनात वाट्याला येणाऱ्या विभिन्न भूमिका, नाना प्रकारचे व्यवहार या सर्व बाबतींत धर्म ही संकल्पना लागू होते. 'स्वधर्म श्रेयस्कर, परधर्म भयावह' याचा एक अर्थ असा की, माझा 'स्व' जो असतो त्याला अनुरूप योग्य व न्याय्य (Righteous) असा धर्म कोणता ते मी जाणून त्या 'स्वधर्मा'चे पालन करावे. मी जर शिक्षकाच्या पेशात असलो, मी जर वैद्य/डॉक्टर असलो, मी जर राजा असलो तर त्या त्या पेशाचा म्हणून धर्म असतो (उदा., डॉक्टरी पेशाच्या संदर्भातील 'हिपोक्रॅटिक कोड') ज्याचे पालन मी करावे. धर्मपालनाने काय साधते? धर्मपालनाने समाजाची योग्य, नीतिमान धारणा होते. आणि व्यक्ती म्हणून मी उन्नत होतो, माझे जीवन व व्यक्तित्व स्वस्थ, संतुलित व निरामय बनते.

आपल्याकडे मानवी जीवन चार 'आश्रमां'मध्ये विभागण्याची कल्पना आहे. समाजजीवनाच्या दृष्टीने गृहस्थाश्रमाचे स्थान मध्यवर्ती आहे, कारण गृहस्थधर्माच्या पालनामधून समाजाची धारणा होते व अभ्युदयही साधतो.*

'धर्मा'विषयी प्रा. मे.पुं. रेगे यांनी त्यांच्या *हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन* या ग्रंथात केलेली मांडणी या संदर्भात महत्त्वपूर्ण, उद्‌बोधक व मार्गदर्शक आहे. प्रा. रेगे म्हणतात, "माणसाच्या प्रकृतीतच जी सामाजिकता अंतर्भूत असते तिच्यामुळे 'धर्म' ही संकल्पना माणसाला गवसू शकते. धर्म हे माणसाचे श्रेय बनते... धर्माशी विसंगत असलेला स्वार्थ — म्हणजे अर्थ-काम — हा माणसाचा खरा स्वार्थ नसतो, त्याचा स्वतःचा खराखुरा 'अर्थ' नसतो; म्हणजे त्याचे खरे श्रेय नसते, तो श्रेयाचा केवळ आभास असतो; आणि म्हणून धर्मपालनात माणसाला आपल्या खऱ्या अर्थ-कामाचा कधीही त्याग करावा लागत नाही असे म्हणता येईल... धर्म-अर्थ-कामांच्या पलीकडे असणाऱ्या श्रेयाची ओढ माणसाला असते ह्या अनुभवावर आध्यात्मिक मार्ग आधारलेला आहे.... सर्वधर्मसमभावाचे हे तात्त्विक अधिष्ठान आहे... अर्थ-काम ह्यांच्याशी निगडित असलेला धर्म हा सामाजिक धर्म असतो,.... मोक्षसाधनेचा धर्म, मोक्षधर्म, हा ह्या धर्माहून भिन्न असतो पण त्याला पूरक असतो... अहंकाराचे विसर्जन करणे हे मोक्षधर्माचे उद्दिष्ट असते. आपण एक अलग कर्ता आणि भोक्ता आहोत आणि आपले हित किंवा आपले सुख यांना आपल्या जीवनात पहिले स्थान असले पाहिजे, इतर सर्व गोष्टी गौण, आनुषंगिक, किंवा साधनभूत आहेत, ही नैसर्गिक भावना म्हणजे अहंकार. ह्या अहंकाराचे विसर्जन करण्याचा मार्ग म्हणजे साधारणधर्माचे पालन करणे. हा साधारणधर्म म्हणजे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह किंवा बौद्ध पारमिता इत्यादी. 'सर्वभूतहितेरति' किंवा 'आत्मौपम्य-बुद्धि' हे साधारणधर्माचे सार आहे... साधारणधर्म वर्णनिरपेक्ष आहे. तो सर्व माणसांचा धर्म आहे आणि सर्वांना उद्देशून आचरण्याचा — केवळ माणसांना उद्देशून नव्हे, तर भूतमात्राला उद्देशून आचरायचा — धर्म आहे. सर्व माणसांचे हित साधायचे ह्याचा अर्थ प्रत्येक माणसाला त्याचा धर्म-अर्थ-काम साधता येईल अशी राहटी—लोकयात्रा — निर्माण करावयाची. आधुनिक दृष्टीने ह्या धर्म-अर्थ-कामात प्रत्येक व्यक्तीची समान स्वायत्तता आणि समान प्रतिष्ठा ह्यांना अनिवार्य स्थान आहे. ह्याचा अर्थ असा की, वर्णव्यवस्था विसर्जित केली पाहिजे. पण वर्णधर्म गेला तरी सामाजिक धर्म राहील.... मोक्षधर्म — साधारणधर्म — हा सामाजिक धर्माला पूरक आहे. प्रत्येकाला आपला अर्थ-काम साधण्याची समान संधी आणि

---

* या सर्व संकल्पना व संस्था या 'हिंदू' आहेत असे म्हटले जाईल. ज्या लोकांमध्ये या संकल्पना व संस्था आढळतात त्यांना आज आपण हिंदू म्हणून ओळखतो ही गोष्ट खरी. पण स्वतःची ओळख 'हिंदू' अशी येथील लोकांना नव्हती अशा प्राचीन काळातल्या या संकल्पना व संस्था आहेत. भारताच्या ऐतिहासिक वाटचालीमध्ये पुढच्या काळात अन्य संस्कृती, धर्म (इंग्रजीतल्या रूढ religion या अर्थी), तत्त्वविचार व परंपरा यांच्या करवी आणखीही अनेक संकल्पना व संस्था यांची भर पडत राहून आपला वारसा समृद्ध होत आला आहे. हिंदू, मुस्लिम, ख्रिस्ती या शब्दांच्या खोड्यामध्ये आपण अडकलो नाही तर, प्राचीनतम काळापासून आपली भारतीय परंपरा कसकशी जडत घडत गेली त्याची एक तटस्थभावाने उकल करता येईल. ब्रिटिश राजवटीच्या काळात, संकुचित कट्टर राष्ट्रवादी राजकारणामुळे या शब्दांना वेगळेच महत्त्व व अर्थ प्राप्त झाले. ख्रिस्ती वा मुस्लिम व्यक्ती 'भारतीय'त्वापासून एक अंतर राखण्यात धन्यता मानू लागल्या आणि हिंदू व्यक्ती त्यांच्याकडे शत्रुत्वाच्या भावनेने पाहू लागल्या. आज आपण सर्वांनीच याच्या पलिकडे जाण्याची नितांत आवश्यकता आहे.

स्वातंत्र्य जिच्यात आहे अशा समाजव्यवस्थेत व्यक्तीची स्थानपरत्वे जी कर्तव्ये असतात तो तिचा सामाजिक धर्म... ह्या धर्मपालनातील 'सात्त्विकते'च्या वेगवेगळ्या पायऱ्या आहेत. साधारणधर्म ही त्याच्यापुढची पायरी आहे.. स्वातंत्र्य आणि समता ह्या न्यायामध्ये अंतर्भूत असतात. बंधुभाव न्यायापलिकडे जातो. तो आध्यात्मिकतेवर – साधारणधर्मावर – आधारता येईल किंवा तो गणवादावर (Tribalism) आधारता येईल.... निखळ बंधुभाव हा (कदाचित) आध्यात्मिकतेवरच आधारता येईल.... अर्थ-कामाची अमर्याद साधना साधारणधर्माशी विसंगत आहे. अर्थ-कामाची अमर्याद साधना करण्याची प्रेरणा व्यक्तीला स्वार्थापासून लाभेल किंवा मानवजातीच्या सामाईक अहंकारातून लाभेल. ही अंहकाराची दोन रूपे आहेत व अहंकार साधारण-धर्माच्या विरोधी आहे... सम्यक् सामाजिक परिवर्तनाचे (साधारणधर्म) हे प्रेरणातत्त्व आहे." (पृ. १११-११५)

भारतीय समाजाची (ज्यात 'हिंदू' म्हणून ओळखला जाणारा समाज सर्वात मोठा आहे, पण एकमेव नाही) समाजवादी समाजाच्या उभारणीच्या दिशेने वाटचाल, प्रा. रेगे यांनी स्पष्ट केल्याप्रमाणे, सामाजिक धर्मापलीकडे पोचणाऱ्या 'साधारण-धर्मा'च्या पायावरच अधिक सम्यक स्वरूपात होऊ शकेल. साधारणधर्म ही केवळ 'हिंदू' संकल्पना नाही; तिला बुद्ध, महमंद पैगंबर, येशू ख्रिस्त या धर्मसंस्थापकांच्या शिकवणुकीचाही भक्कम आधार आहे. 'गणवादा'पलीकडे पोचलेल्या जगातील सर्व मोठ्या, व्यामिश्र समाजांमध्ये साधारणधर्माची शिकवण देणारे व 'बोले तैसा चाले' असे जगणारे साधुसंत होऊन गेले आहेत. आजही त्यांचा आढळ होतो. साधारणधर्माच्या पालनावर भर देणारे, बंधुभाव, प्रेम, यांची शिकवण देणारे साधुसंत हे सर्वाधिकारवादी धर्मसंस्थेच्या विरोधात बंडखोरी करताना दिसतात. धर्मसंस्था ही बहुतेकवेळा राज्यसत्तेशी हातमिळवणी करून स्वतः सत्ताधीश, श्रीमंत व सर्वाधिकारवादी होताना आढळते. हे साधुसंत जनसामान्यांमध्ये वावरणारे, परमार्थी, अत्यंत साधी राहणी अंगिकारणारे, निरिच्छ व सेवाभावी असतात. हे साधुसंत विचाराने व आचरणाने खरे आद्य समाजवादी म्हणावयास हवेत.

समाजाची संस्थात्मक पुनर्रचना करण्याचा, भौतिक वैपुल्य व समृद्धी निर्माण करण्याचा 'प्रॉजेक्ट' संतांनी कधी समोर मांडला नाही; त्या त्या काळच्या शिष्टमान्य, प्रस्थापित 'सामाजिकधर्मा'ला त्यांची स्वीकृती होती. आधुनिक कालीन परिवर्तनवादी मंडळींना या त्रुटीसाठी त्यांचा अव्हेर करणे आवश्यक वाटते. प्रत्येकच समाज पुरातनकालापासून चालत आलेला असतो; त्याची एक परंपरा असते, रचना असते; त्या पारंपरिक व्यवस्थेला त्या त्या समाजाच्या सभासदांनी, मानवी प्रयत्नांनी आमूल परिवर्तन घडवून आणण्यापलीकडील म्हणून स्वीकारायचे असते; बदलही मानवाच्या आवाक्याबाहेरील शक्तींनी घडून येतात, ही आधुनिकपूर्व सर्वच समाजांची धारणा होती. आधुनिक काळाचे वैशिष्ट्य हे की आपल्या मनातील आराखड्यानुरूप माणूस समाज बदलवू शकतो ही धारणा शिष्टमान्य व प्रस्थापित झाली. तेव्हा, साधुसंतांच्या शिकवणुकीत आपल्याला खुपणारी त्रुटी दूर करणारी भर आपण आता घालू शकतो. मानवी स्वभावप्रकृतीच्या, परिस्थितीच्या आणि मानवी सामर्थ्याच्या मर्यादांचे पूर्ण भान ठेवून.

– १० –

वर्तमान भारतीय समाजाचे वर्णन, एका सरहद्दीमध्ये एकाच वेळी वास करीत असलेली 'दोन राष्ट्रे' असेही करता येईल. समाजाचा एक विभाग असा आहे की जो एका अर्थी आजच्या सधन, विकसित पाश्चात्त्य समाजाचे, अर्थव्यवस्थेचेच एक अंग बनलेला आहे; तर दुसरा उपेक्षित, वंचित, दरिद्री राहिलेला व ठेवला गेलेला आहे. एकाच राष्ट्रराज्याचे हे दोन्ही विभाग असल्याकारणाने त्यांच्यात आपापसात संबंध आहेत. शोषक-शोषित असा तो विषम संबंध आहे.

अर्थशास्त्राचे विख्यात प्राध्यापक अम्लान दत्त यांनी सातआठ वर्षांपूर्वी पुणे येथे तीन व्याख्याने दिली. ती दोनेक वर्षांपूर्वी Towards an Alternative Economic Order या नावाने प्रसिद्ध झाली आहेत. त्यांचे म्हणणे असे की, आपल्या अर्थव्यवस्थेच्या एका विभागाची यशस्वी व कार्यक्षम जुळवणी पाश्चात्त्य भांडवलशाही जागतिक अर्थव्यवस्थेबरोबर करण्याची गरज असून हे आव्हान पेलण्याखेरीज आपल्याला गत्यंतर नाही; या अर्थाने जागतिकीकरणाला आपल्याला केवळ सामोरे जावे लागणार आहे एवढेच नाही, तर ते आव्हान झेलावे व पचवावे लागणार आहे. पण अर्थव्यवस्थेचा हा विभाग म्हणजे काही भारताचा संपूर्ण आर्थिक व्यवहार नव्हे. जागतिकीकरणाशी यशस्वी सांगड घालण्यासाठी नवीन आर्थिक नीतीचा १९९१च्या आसपास आपण अंगिकार केला. आपले काही प्रश्न या नीतीचा अवलंब करून सुटणारे नाहीतच; उलट ते जास्त तीव्र व उग्र होत आहेत. उदाहरणार्थ, रोजगारांचा






संकोच; लोकांचे जीवनाधार असलेल्या संसाधनांचा ताबा वेगवेगळ्या प्रकारे भांडवलदार-उद्योजकांच्या हातात दिला जाणे; संसाधनांचा मोठ्या प्रमाणात ऱ्हास होणे; इत्यादी. लोकसंख्येचा हा जो वंचित वा वंचित होत चाललेला विभाग आहे त्याची समज, ज्ञान, कौशल्य व संघटन यांच्यात वाढ करून रचनात्मक कार्याद्वारे त्याची शक्ती वाढवीत एका पर्यायी राजकीय-आर्थिक समाजव्यवस्थेची पायाभरणी, उभारणी करण्याचे कार्य पार पाडण्याचे महत्त्व प्रा. अम्लान दत्त यांनी ठसविले आहे. ते म्हणतात. "The economic structure of society as formed by modern industrialisation is a very centralised structure. It represents a system with a high degree of centralisation of power. We cannot get rid of this economic structure overnight.... It would be wrong to ignore some of its compulsions. But we cannot wait for the destruction of the old structure before we start working for the new."

ही नवी रचना वंचित, शोषित जनांसाठी असेल. म्हणजे त्यांनी गरिबीत व वंचित अवस्थेत राहण्याचे मान्य करावयाचे नाही. तर लोकसहभागाधिष्ठित विकेंद्रित समाजवादी मानवीय संबंधांवर आधारित एका स्वायत्त, संपन्न व आत्मनिर्भर अशा व्यवस्थेची उभारणी करण्याची ती गोष्ट आहे.

वैज्ञानिक-तंत्रवैज्ञानिक क्षेत्रात नव्या वळणाचे सर्जनशील संशोधन त्यासाठी आवश्यक असेल. वैज्ञानिकदृष्ट्या अधिक प्रगल्भ व सूक्ष्म ज्ञानाच्या पायावर निसर्गसृष्टीशी आत्मीयतेचे, आदराचे व समभावाचे संबंध प्रस्थापित करणारे, संसाधने ही त्याचवेळी एका अंगाने जीवनव्यवस्था पण असतात याचे पूर्ण जबाबदार भान राखून विकसित केलेले असे ते विज्ञान-तंत्रविज्ञान असेल. माती, जिवाणू (microbes) व कीटक, पाणी, सूर्यप्रकाश, इत्यादी घटकांचा सुयोग्य, संयमित व संतुलित वापर करणारी उच्च उत्पादनक्षम शेती केली जाऊ शकते हे जगभर आज प्रमाणित झाले आहे. हीच गोष्ट स्वास्थ्य, औषधोपचार या क्षेत्रातही प्रमाणित होत आहे. तात्पर्य, जनसामान्यांच्या पायाभूत गरजा चांगल्याप्रकारे भागविण्याचे पर्यायी समृद्ध मार्ग विज्ञानाच्या वाटचालीतून खुले होत आहेत. याचा पुरेसा लाभ घेत जनसामान्यांच्या सहभागामधून पर्यायी समाजवादी समाजाची पायाभरणी, उभारणी आज व्यवहार्य, इष्ट व शुभप्रद ठरत आहे.

अनेक क्षेत्रे अशी आहेत की ज्यांच्यामध्ये लोकसहभागातून स्थानिक पातळीवर विकेंद्रित स्वरूपात नवसमाजाची रचना फार मोठ्या भांडवली गुंतवणुकीशिवाय सुरू होऊ शकते. काही विषय तर असे आहेत की, ज्यांच्या बाबतीत समाजवादी मूल्यांच्या आधारे परस्परसंबंधांची वीण बदलावयाची गोष्ट आहे. उदाहरणार्थ, विषमतेस जन्म देणाऱ्या उच्चनीचभावावर आधारित वर्णभेद व जातपात, माणुसकीला काळे फासणारी अस्पृश्यता, विभिन्न धर्मीय व भाषिक समाजांमधील दुजाभाव व वैमनस्य यांची समाप्ती, इत्यादी. अनेक कामे अशी आहेत की ती बव्हंशी स्थानिक श्रमशक्ती, बौद्धिक गुंतवणूक व अल्पप्रमाणात पैसा यांच्या जोरावर, त्यांचा दृढ संकल्प असेल तर, लोक पार पाडू शकतात. पण, दुर्दैवाने, सरकारी योजनांद्वारा व बाहेरून येणाऱ्या पैशातूनच कामे होऊ शकतात व व्हावीत ही मानसिकता खोलवर रुजली आहे. सार्वजनिक स्वच्छता, प्रौढ साक्षरता व बालशिक्षण, पावसाचे पाणी राखून, साठवून त्याचा कल्पकतेने कमाल उत्पादक वापर, विघटनशील जैविक कचरा, मानवी व गुराढोरांचे मलमूत्र यांपासुन उत्तम खताची निर्मिती, बायोगॅस संयंत्राद्वारे इंधनाची निर्मिती, शेती, जंगलसंवर्धन इत्यादी. आजचे एक चित्र असे आहे की, विविध योजनांखाली ग्रामपंचायतींकडे पैसा येतो पण तो गावातील सरपंच व अन्य सभासद वा ठेकेदार यांची धन करतो. सरकारी खात्यांमार्फत जी कामे केली जातात तिथे पैसा पुष्कळ खर्च होऊनही कामे धड होत नाहीत व निष्कारण त्यांच्यावरील खर्च फुगतो. एका अंगाने ही समाजविघटनाचीच लक्षणे व फलिते आहेत. म्हणजे, पुन्हा, मुद्दा संबंधांची वीण मूल्यांच्या आधारे पुन्हा निर्माण करण्याचा आहे.

महात्मा गांधींची भूमिका पाहिली तर ती 'अराजकवादी' नव्हती. राज्यसत्ता असेल; दंडशक्तीचा वापरही प्रसंगी करावा लागेल; राष्ट्रव्यापी धोरणे, उपक्रम, योजना, उद्योग यांना स्थान असेल; या कारणाने केंद्रीकरण, नोकरशाही, कायदेकानूंचे जंजाळ अशा अनेक गोष्टीही राहणार. आणि त्यांना त्यांचे काही काम राहणारच. आणि म्हणून राज्यसत्तेवर अंकुश ठेवणाऱ्या लोकशक्तीची कायमची आवश्यकता त्यांनी आग्रहपूर्वक मांडली होती. मुख्य रचना विकेंद्रित, स्वाश्रयी व स्वायत्त हवी, असे त्यांचे म्हणणे होते. आणि तशी रचना केली तरच लोकाधिष्ठित समाजवादाला अवकाश राहील अशी त्यांची दृष्टी होती. प्रतिकूल परिस्तितीमध्ये, व बलाढ्य प्रतिपक्षीयांशी, त्यांच्या इतके लोकलढे

अन्य कोणा नेत्याने अलीकडच्या काळात संघटित केले नसतील. पण खऱ्या अर्थाने चिरस्थायी स्वरूपात सत्याग्रही लोकशक्तीचे संवर्धन करावयाचे असेल तर अनेकांगी रचनात्मक कार्यांच्या द्वारा जबाबदार, सक्षम व स्वायत्त नागरिक समाजाची उभारणी करीत राहण्याचे महत्त्व त्यांनी ठसविले.

लोकशाही समाजवादाची निर्मिती जनसामान्यांच्या स्वाश्रयी, सार्वत्रिक, स्वायत्त अभिक्रमामधून सुरू व्हावयास हवी. तिचे एक अग्रक्रमीय उद्दिष्ट दारिद्र्याचे निर्मूलन, ढोरमेहनतीची समाप्ती हे राहील आणि दुसरे, तितकेच अग्रक्रमीय उद्दिष्ट भाईचाऱ्यावर उभारलेले सामाईक न्याय्य (righteous) जीवन हे राहील. सुखोपभोगात अमर्याद वाढ (चंगळवाद) या मोहात पाडणाऱ्या आर्थिक विचाराच्या व केंद्रीभूत राज्यसत्तेच्या विळख्यात सापडल्यास समाजवादाची इतिश्री ठरलेलीच आहे. या अंगाने पाहिल्यास, बुद्ध, कबीर, तुकाराम, नानक या साधुसंतांच्या शिकवणुकीचा वारसा समाजवादी समाजाची उभारणी करण्यासाठी आपणास उपकारक ठरणारा आहे. आपापल्या गावांमध्ये, मोहल्ल्यांमध्ये, समुदायांमध्ये जीवनाच्या विविध क्षेत्रांमध्ये समाजवादी मूल्ये व संबंध साकार करणारी कामे व संस्था उभ्या करून लोक आत्मविश्वास व शक्ती प्राप्त करतील तेव्हा वरिष्ठ पातळ्यांवरील अर्थ व राज्यव्यवस्थेला समाजवादी वळण देण्याचे काम करणे जनांच्या आवाक्यात येईल. तोपर्यंत धीराने, शांतपणे तळाशी (at the grassroot) पायाभरणीचे काम करावयास हवे. ज्या ज्या क्षेत्रात व विषयात असे काम आपण जेवढे करीत जाऊ तेवढे त्याचे फळ लगेचच मिळणार असल्याने, म्हणजे माणसामाणसांमधील संबंध समतेचे व बंधुभावाचे होण्याच्या दिशेने ठोस बदल होण्यास लगेचच आरंभ होणार असल्याने, तसेच आर्थिक स्थितीत सुधार होऊन शक्ती वाढणार असल्याने, पायाभरणीचे काम दरएक कार्यक्रमागणिक पुढेच पडत जाईल.

राज्यसत्ताकेंद्री समाजवादी पुनर्रचनेचे अद्यापही मोठे आकर्षण आहे. याचे कारण सगळे राष्ट्र सत्तापालटाने समाजवादी झाल्याचा (वा नजीकच्या भविष्यात होण्याचा) आभास निर्माण होतो. या मार्गाचे आकर्षण वाटण्याचे आणखी एक कारण हेही आहे की लोकशिक्षण, प्रबोधन करून लोकांचा अभिक्रम सक्रिय व सक्षम करण्याची गरज राहत नाही, अशी गोड समजूत करून घेता येते. सरकारी पैसा व बडगा, नोकरशाही यांच्या जोरावर सर्वत्र एका वेळी एकसारखा बदल घडून येणार असल्याचे चित्र रंगविता येते. लोकशाहीची खरी चाड बाळगून जर समाजवादी समाजाची उभारणी करावयाचा आपला स्पष्ट दृढसंकल्प असला तर साचेबंद, एकसारखा (uniform and regimented) असा समाजवाद येऊ शकत नाही; वेगवेगळ्या कारणांमुळे स्थानपरत्वे त्यात वैविध्य आणि प्रयोगशीलता यांचा आढळ होणार व तसा तो व्हावयाला हवा ही गोष्ट मोकळेपणाने मान्य केली पाहिजे.

भारतात समाजवादाच्या पायाभरणीचे कार्य जातपात, स्पृश्यास्पृश्यता, धर्मभेद, एकेका धार्मिक समाजातील पंथभेद, भाषाभेद असे जे नाना भेद लोकांना सतत विभागत आहेत, त्यांच्यात विषमता व उच्चनीचभाव कायम ठेवीत आहेत, त्यांच्यात परस्पर वैमनस्य व कलह वाढवीत आहेत त्या भेदांचा निरास घडवून आणणारे रचनात्मक कार्यक्रम यांच्याद्वारेच सुरू होऊ शकणार आहे. औद्योगिकीकरण, शहरीकरण, शिक्षणप्रसार, आरक्षण व सवलतींची धोरणे व त्यांची राबवणूक, निवडणुकांचे राजकारण व त्यासाठीचे राजकीय जागरण व संघटन, आपापल्या हक्कांचे, मागण्यांचे लढे यांमधून विपरीत परिणामच घडून आलेला अनुभवास येतो. उपरोधाची गोष्ट अशी की, सत्ता व मत्ता ज्यांच्या हाती एकवटते आहे, जे व्यक्तिवादी-भोगवादी आहेत त्यांचा एक सबगोलंकार अभिजनवर्ग आकारास येत आहे, आणि तो आपल्या मुलामुलींना 'कॉन्व्हेन्ट' शाळा-कॉलेजांच्या माध्यमातून उच्चभ्रू संस्कृतीचे पाठ देण्याचा आग्रहपूर्वक कार्यक्रम राबवून एक नवा राज्यकर्ता वर्ग घडवीत आहे. या नव्या सधन, सत्तावान अभिजन राज्यकर्त्या वर्गाला पश्चिमी विकसित समाजव्यवस्थेचे, जीवनशैलीचे व व्यक्तिवादी स्वार्थसाधक मूल्यांचे व नमुन्यांचे आकर्षण आहे. समाजवादी मूल्ये व विचार रुजवायचा असेल तर अशा रचनात्मक कामांचा व संस्थात्मक आकृतिबंधांचा शोध घ्यायला हवा ज्यामुळे पारंपरिक व आधुनिक, दोन्ही प्रकारची कप्पेबंदी मोडून सर्वांचा एकच मोठा प्रवाह बनेल.

समाजवादाच्या उभारणीसाठी उपयोगी, प्रभावी व क्रांतिकारक म्हणून जी विश्लेषणे, धोरणे व कार्यक्रम, साधनमार्ग यांचा गेल्या तीसचाळीस वर्षांमध्ये आग्रहपूर्वक पुरस्कार व अवलंब आपण करीत आलो त्यांविषयी मूलभूत फेरविचार करण्याची नवता, सृजनशीलता व प्रयोगशीलता आपण प्रकट करावयास हवी हा कळीचा मुद्दा आहे.

■■

# *राजा लियर* : सत्तासंघर्षाचे नाट्य

(भाग ३)

सुधीर रसाळ




– ७ –

चौथ्या अंकापासून *राजा लियर* हे नाटक अंताकडे जाण्यासाठी वेग घेते आणि लियर कुटुंबाच्या संपूर्ण विनाशात विराम पावते. या नाटकाच्या उत्तरार्धातही ग्लॉस्टर, एडगर, एडमंड यांच्या आणि लियर व त्याच्या मुली यांच्या कथानकांची साम्यविरोधात्मक आणि परस्परपूरक अशी गुंफण शेक्सपियर करीत जातो.

लियरप्रमाणे ग्लॉस्टरही लोकप्रिय आहे. डोळे फोडून त्याला वाड्याबाहेर काढल्यावर त्याचा एक प्रजाजन "मी आपला रयत" असल्याचे सांगून त्याला आधार देऊन टुकार टॉमच्या स्वाधीन करतो. आपल्यामुळे आपल्या प्रजाजनावर संकट येऊ नये म्हणून ग्लॉस्टरही, "भल्या माणसा, इथून जा... तुझ्या प्रयत्नामुळे... तुलाच... होईल अपाय" (४.१.१४७) असे सांगून त्याला घालवून देऊ पाहतो. त्याचे डोळे फोडल्यावर आणि तो निराधार झाल्यावर ग्लॉस्टरलाही लियरप्रमाणे जीवनाचे एक नवे भान येते. डोळे चांगले असताना एडगरचे आपल्यावरचे प्रेम आणि एडमंडची बेईमानी आपण पाहू शकलो नाही याचे त्याला दुःख होते. "डोळे असतानाच मी ठेचाळलो" (४.१.१४८) असे तो म्हणतो. टुकार टॉमजवळ आल्यावर ग्लॉस्टर म्हणतो, "मी गेल्या रात्रीच्या वादळामध्ये पाहिला एक असलाच माणूस, त्याला पाहिल्यावर मला मानवच वाटला जंतुवत. लगेच आला माझा मुलगा माझ्यासमोर... त्यानंतर पुष्कळच उमजले; उनाड मुलांना जशा माशा तसेच आपण देवांना; ते आपल्याला असतात मारीत त्यांच्या क्रीडेसाठी." (४.१.१४८) अशी त्याला माणसाच्या नगण्यतेची, क्षुद्रतेची आणि दुर्बलतेची जाणीव होते. आता त्याच्या मनात टुकार टॉमबद्दल लियरप्रमाणेच करुणा दाटून येते. 'आंधळ्या' ग्लॉस्टरला 'वेडा' टुकार टॉम आता डोव्हरचा रस्ता दाखवणार आहे. यावर ग्लॉस्टर म्हणतो. "तो शाप आहे कालालाच, जिथे वेडे आहेत दाखवीत आंधळ्यांना मार्ग." अशा पद्धतीने तो माणसाच्या आकलनाच्या आंधळेपणाची आणि त्याच्याकडून चुकीचे निर्णय घेतले जाण्याची जाणीव प्रकट करतो. लियरही आपले मुलींबद्दलचे आकलन चुकल्याबद्दल आपले डोके फोडून घेतो. (१.४.९७) या दोघांनाही माणसांच्या मर्यादांची आणि दुबळेपणाची जाणीव झालेली आहे. आपण सर्वच अपूर्ण माणसे आहोत; म्हणूनच आपण एकमेकांच्या दुःखात एकमेकांना आधार देत, एकमेकांच्या जीवनात सुख निर्माण करीत जगले पाहिजे असे लियर आणि ग्लॉस्टर या दोघांनाही वाटते. म्हणून ग्लॉस्टर टुकार टॉमला पैशाची थैली देऊन म्हणतो, "असेच दैवतांनो, घडवा सदैव! तुमच्या दंडकांना दास बनवणाऱ्या, दया नसल्यामुळे दृष्टी हरवणाऱ्या, अतिसंग्रही आणि अतिमुक्त माणसाला घडू दे प्रचीती तुमच्या सामर्थ्याची लौकरात लौकर, म्हणजे वितरण करील नाहीशी ही अतिरिक्तता आणि लाभेल प्रत्येकाला पुरेसे" (४.१.१४९) वादळात झोडपला गेलेल्या लियरलाही नेमकी हीच जाणीव होते.

*राजा लियर* या नाटकात शेक्सपियरने मानवनिर्मित विषमतेसंबंधीची जाणीव प्रकट केली आहे. मुळात पशूंप्रमाणेच समान असलेल्या मानवातील काहींनी, या समानतेवर अधिष्ठित असलेल्या परमेश्वरी दंडकांना आपले दास करून सत्ता आणि जीवनावश्यक वस्तू आपल्याजवळ केंद्रित केल्या. ही माणसे "अतिमुक्त" आणि "अतिसंग्रही" बनली. सत्ता आणि धनदौलत यांच्या अभेद्य तटबंदीत जगणाऱ्या सत्ताधीशांना सत्ता ही केवळ आपल्याच प्रेरणांच्या तृप्तीसाठी आहे असे वाटत असते. सत्तेचा व धनदौलतीचा मनःपूत उपभोग घेणे हा केवळ आपलाच हक्क असल्याची त्यांची समजूत असते. त्यामुळे सत्ताप्राप्तीची आणि धनप्राप्तीची आंधळी, नग्न, मूल्यरहित प्रेरणा त्यांच्या मनात सदैव जागी राहते. त्यातून विनाशक सत्तासंघर्ष उद्भवतो. नवे सत्ताधारी प्रस्थापित सत्ताधाऱ्यांना सत्ता-धनदौलतीच्या तटबंदीबाहेर फेकून देतात. एका निराधार, असहाय जीवनाचे दान त्यांच्या पदरात पडते. तेव्हा सत्ताप्रेरणेचा मूल्यात्मक अर्थ त्यांना कळून येतो. परंतु मूल्यात्मक उद्दिष्टांसाठी सत्ता राबवण्यासाठी त्यांच्याजवळ सत्तेचे हत्यारच राहिलेले नसते. ही सत्तेसंबंधीची विपरीतता शेक्सपियरने या नाटकात प्रकट केलेली आहे.

सत्तेच्या मूल्यात्मक अर्थाचा साक्षात्कार जरी दोघांनाही होत असला तरी त्याचे या दोघांवर भिन्न परिणाम होतात.






अनुक्रमणिका

आपण आंधळे, सत्तावंचित, निराधार, त्यामुळे आपल्याजवळ जगण्यासारखे काहीच नाही; म्हणून मृत्यूशिवाय आपल्याला पर्यायच नाही, असे वाटल्यामुळे ग्लॉस्टर टुकार टॉमच्या साह्याने आत्महत्त्येच्या मार्गाने वाटचाल करू लागतो. मूल्यात्मक पातळीवरील सत्तेचा विधायक अर्थ कळलेल्या लियरची सत्ताप्रेरणा या नव्या अर्थाने जागृत झाली आहे. पददलितांच्या कल्याणार्थ आता त्याला सत्ता हवी आहे. सत्ताप्रेरणेच्या आत्मकेंद्रित रूपाकडून मानवसंलग्न रूपाकडे झालेला प्रवास हे या नाटकाचे आशयसूत्र आहे.

डोव्हरला आलेला लियर वेडेपणाच्या लहरीत भणंगासारखा फिरतो आहे. आत्महत्त्या करायला आलेल्या पण आत्महत्त्या फसलेल्या ग्लॉस्टरची आणि लियरची भेट होते. लियरचे वेड आणि या वेडात त्याला प्राप्त झालेला नवा शहाणपणा यांचे एक सूक्ष्म आणि व्यामिश्र दर्शन शेक्सपियरने या भेटीत घडवले आहे. त्याचे मन आपल्या दोन्ही मुलींच्या क्रौर्याच्या आठवणीने आणि त्यांनी पिता-अपत्य-प्रेमसंबंध झिडकारल्याच्या दुःखाने आणि त्याबरोबरच मूल्यात्मक सत्तेच्या नव्या जाणिवेने व्यापलेले आहे. त्याचे वेडेपण आणि त्याचे शहाणपणाचे भाष्यात्मक कथन जाणिवांच्या या दोन ध्रुवांमधील आंदोलनांतून साकार होत आहे. आपण सत्ताधीश राजे असल्याची त्याची जाणीव अद्याप कायम आहे. परंतु आता सत्ताधीश असण्याचा अर्थ मात्र बदलला आहे. आता त्याने पंचमहाभूतांच्या अंतिम, निर्णायक सत्तेचे मांडलिकत्व पत्करले आहे. बोडक्या डोक्याने, मुकुटविरहित अवस्थेत ग्लॉस्टरच्या वाड्यातून बाहेर वादळात गेलेला लियर जेव्हा डोव्हरला येतो तेव्हा रानवनस्पतींचा मुकुट तयार करून तो आपल्या डोक्यावर घालतो. (४.४.१५६) कधी कधी तो रानफुलांचा पोषाख अंगावर चढवतो. (४.६.१६२). आता तो निसर्गाशी एकरूप झाला आहे. निसर्गातील स्वाभाविक सत्तेचे आपण प्रतिनिधी असल्याचे तो या 'राज'पोषाखातून सूचित करतो. त्याचे हे वर्तन एकाचवेळी वेडेपणाचे आणि नव्याने प्राप्त झालेल्या आंतरिक शहाणपणाचे आहे.

ग्लॉस्टरच्या भेट प्रसंगात त्याला भासदृश्ये दिसू लागतात. ती त्याच्या मनात जागृत असलेल्या दोन जाणिवांच्या दाबातून साकार झालेली आहेत. सैन्याचा पगार देण्यासाठी आपण नाणी पाडतो आहोत. आपल्याला अटक करण्यासाठी आलेले आहेत. तेव्हा तो म्हणतो आहे. "नाही, नाणी पाडल्याबद्दल ते नाही करू शकत मला स्पर्श; मी आहे प्रत्यक्ष राजाच." (४.६.१६२) आपण सैनिकांना भत्ता वाटतो आहोत, धनुष्य परिणामकारकपणे कसे वापरायचे हे आपण सैनिकांना शिकवतो आहोत, असे भास त्याला होतात. आपला शत्रू केवळ उंदरासारखा क्षुद्र, त्याला मारायला शस्त्र कशाला? त्याला आवडणारा भाजलेला खवाही पुरेसा आहे; असा विचार त्याच्या मनात येत आहे. पुन्हा त्याला युद्धाच्या तयारीचे दृश्य दिसू लागते. रंगवलेल्या भाले-कुऱ्हाडी घेऊन सैनिक आले आहेत; धनुर्धारी निशाणावर अचूक बाण मारीत आहेत; सैनिकांच्या तळावर अचानक कोणीतरी आले आहे; आपण त्याला परवलीचा शब्द विचारीत आहोत, असे दृश्य त्याला दिसू लागते. आपल्या मुलींना पकडून त्यांच्या गुन्ह्याचा न्याय करण्याच्या त्याच्या प्रेरणेतून हे दृश्य निर्माण झाले आहे.

सत्ता छिनावण्यासाठी आपल्या मुलींनी आपला छळ करताना आपल्या म्हातारपणाचे भांडवल केले. ज्या गॉनरिलने हे केले तीच आता म्हातारी झाली असून तिला पांढरी दाढी फुटली आहे, असे दृश्य त्याला पांढऱ्या दाढीच्या ग्लॉस्टरमध्ये दिसू लागते. (४.६.१६२) दाढी पांढरी झाल्यामुळे आता गॉनरिलकडून सत्ता छिनावून घेतली पाहिजे असा विचार लियरच्या असंतुलित मनात आला आहे. पांढऱ्या दाढीच्या गॉनरिलचे भ्रामक दृश्य दिसताच लियर अचानक शहाण्यासारखा बोलू लागतो. तो म्हणतो, "त्यांनी माझी खुशामत केली एखाद्या कुत्र्यासारखी; आणि मला सांगून टाकले, माझ्या दाढीचे हे केस पांढरे झाले, काळे केस तिथे उगवण्यापूर्वी." (४.६.१६२) मालकाकडून खाद्य मिळवण्यासाठी त्याच्या कुत्र्याने शेपटी हलवून, मालकाचे अंग चाटून जशी त्याची खुशामत करावी तशी आपण राजा असताना आपल्या दोन्ही मुलींनी आपली खुशामत केली. राज्य मिळताच मात्र त्यांना आपल्यात अनेक दोष दिसू लागले. म्हातारे होऊनही आपल्याला अक्कल आली नाही असा आरोप त्यांनी केला. आपण सांगू तशा त्या सत्ता मिळवण्यापूर्वी वागत होत्या. परंतु आपल्या प्रत्येक आज्ञेला त्यांनी म्हटलेले 'हो' किंवा 'नाही' धर्मशास्त्राशी — नैतिकतेशी — सुसंगत नव्हते. त्यात खोटेपणा होता. आपण सर्वशक्तिमान सत्ताधीश असल्याचा आपला भ्रम त्यांनी परिपुष्ट केला. लियरचे हे बोलणे जसे त्याच्या दोन मुलींबद्दल आहे तसेच ते राजमंडळातील सर्व खुशामतखोर सदस्यांबद्दलही आहे. पुढे तो म्हणतो, "जेव्हा एकदा पाऊस आला आणि मी भिजून निघालो, वारा सुटला आणि माझे दात वाजू लागले, मेघगर्जना झाली आणि माझ्या सांगण्यामुळे थांबली



अनुक्रमणिका

नाही तिथेच मी त्यांना ओळखले, तिथेच त्यांचा खोटेपणा मला समजला. छे, त्यांचे शब्द विश्वासार्ह नाहीत. त्यांनी मला सांगितले मी आहे सर्वशक्तिमान; खोटे आहे. मी नाही ज्वरापासून विमुक्त." (४.६.१६२)

लियरने येथे दिलेला कबुलीजवाब, या नाटकातील जाणिवा लक्षात घेण्याच्या दृष्टीने, अतिशय महत्त्वाचा आहे. आपण आपले सारे आयुष्य "आपण सर्वशक्तिमान" असल्याच्या भ्रमात काढले. आपला हा भ्रम सर्वांनीच पुष्ट करीत नेला. वादळाने आपल्याला आपण चारचौघांसारखे सामान्य मानव असल्याचे शिकवले. तेथेच आपण बदललो. ग्लॉस्टर जेव्हा, "ते महाराजच नाहीत काय?" असे विचारतो तेव्हा लियर स्वतःच्या राजेपणाचा उपहास करीत म्हणतो, "होय, कणन्‌कण आहे महाराजांचा. पाहा कशी प्रजा थरकापते, मी माझी नजर रोखल्यावर." (४.६.१६२) एक वेळ अशी होती की याचाच त्याला अभिमान होता. गॉनरिलला तो म्हणाला होता, "काय लियर असा चालतो? असा बोलतो? कुठे आहेत त्याचे डोळे?" (१.४.९५) वादळानंतर बदललेल्या लियरला "मी नाही ज्वरापासून विमुक्त" याची जाणीव होते.

त्याच्या सत्ताप्रेरणेच्या बदललेल्या कल्पनेतून त्याला एक भासदृश्य दिसू लागते. व्यभिचाराच्या आरोपाखाली फाशीची शिक्षा झालेल्यास राजा लियर माफी देऊन टाकत आहे, असे दृश्य त्याला दिसू लागते. लियर युक्तिवाद करतो, "तू निश्चित मरत नाहीस; व्यभिचारासाठी मरायचे?, नाही. चिमणासुद्धा स्त्रीगमन करतो, आणि ते इवलेसे फुलपाखरू करते इष्कबाजी माझ्या डोळ्यांसमोर." (४.६.१६३) निसर्गाशी, माणसाच्या नग्न-नैसर्गिक स्वरूपाशी एकरूप झालेल्या आणि सर्व गोष्टींची नैसर्गिक-प्राकृतिक मूल्यांसह असलेली रूपेच सत्य मानू लागलेल्या लियरला स्त्रीपुरुषांमधील, मानवनिर्मित विधिनिषेधांच्या पलीकडला उत्स्फूर्त, प्रेमजन्य प्रणय आता मान्य आहे. म्हणून आता व्यभिचार त्याला गंभीर गुन्हा वाटत नाही. चिमणा किंवा फुलपाखरू शृंगारातील आपली सहचारिणी विवाहित आहे की नाही, याचा कोठे विचार करते? तेथे विवाहनामक मानवनिर्मित संस्था आणि तिचे विधिनिषेधासारखे मानवनिर्मित दंडक कोठे आहेत? निसर्गाच्या अधिसत्तेचे दर्शन झालेल्या लियरला, नैसर्गिक दंडक नाकारून कृत्रिम नीतिनियमांनी आणि प्रमाणकांनी बांधलेल्या मानवनिर्मित संस्थांचा फोलपणा उमगला आहे.

परंतु या क्षणी लियर वेडाही आहे. त्याचे विचार सहचर-भावाच्या तत्त्वानुसार स्वैरपणे भरकटत आहेत. उत्स्फूर्त प्रणयाकडून तो कामवासनेकडे येतो. पातिव्रत्याचा बहाणा करणारी परंतु संभोगाची अनिर्बंध भूक असलेली स्त्री आला त्याला दिसू लागते. तिच्यावर भाष्य करताना तो म्हणतो, "...एखाद्या रानमांजरीला किंवा एखाद्या माजलेल्या घोडीलाही नसेल संभोगाची तिच्याइतकी अनिर्बंध भूक. कमरेपासून खालच्या भागात त्या असतात फक्त जनावरे आणि स्त्रिया कमरेच्या वर. देवांची मालकी असते फक्त कमरपट्ट्यापर्यंत, खालचे सर्व असते सैतानाचे; तिथेच नरक, तिथेच अंधार; तिथेच असते गंधकाची खाण — जळती, उकळती, दुर्गंधी, सर्वनाश; शी, शी, शी! थूः थूः! बाबा गंधविक्या मला तोळाभर कस्तुरी दे माझी कल्पनाशक्ती सुवासित करण्यासाठी." (४.६.१६३) रानमांजर किंवा घोड्या यांसारख्या पशूंची कामवासना केवळ जनावराच्या पातळीवरची असते. स्त्रीची कामवासना मात्र अशी नाही. स्त्री ही कमरेच्यावर जनावर असते. आपल्या अपत्यांना ती जनावरांप्रमाणेच स्तन्य देऊन त्यांचे पालनपोषण करते. कमरेखाली मात्र ती पशूंप्रमाणे केवळ 'जनावर' नसते. तेथे सैतानाचे राज्य असते. हे शरीर ती अशिव गोष्टींसाठी वापरते. वंशसातत्यासाठी कामवासनेची तृप्ती हे जनावराच्या कामप्रेरणेचे उद्दिष्ट आहे. स्त्रीच्या कामप्रेरणेचे उद्दिष्ट असे जैविक नाही. या प्रेरणेशी अन्य स्वार्थी, अशिव हेतू चिकटलेले असतात. येथे कामप्रेरणा ही 'उद्दिष्ट' नसून अन्य उद्दिष्टे साधण्याचे साधन बनून गेलेले असते. कमरपट्ट्याची जागा एवढीच देवाच्या मालकीची. गळ्यापासून कंबरेपर्यंतचे आणि पायाच्या घोट्यापासून कंबरेपर्यंतचे वस्त्र कंबरेला कमरपट्ट्याने बांधलेले असते. हे वस्त्र लज्जारक्षण तर करतेच शिवाय ऊन-पाऊस-थंडी यांपासून स्त्रीचे रक्षण करते. 'रक्षण' हे देवाचे कार्य; कंबरही हेच करते. तेव्हा स्त्रीच्या शरीराचा तेवढाच भाग देवाच्या मालकीचा.

लियरच्या दोन्ही मुलींनी कामप्रेरणा सत्ताप्राप्तीसाठी वापरण्याचा प्रयत्न केला. लियरचे हे भाष्य गॉनरिल-रीगन यांच्या साधनीभूत कामप्रेरणेवर प्रकाश टाकणारे आहे. याचा अर्थ गॉनरिल-रीगन-एडमंड यांच्यातील कामप्रेरणासंलग्न व्यवहार लियरला माहीत होता, असे नव्हे. तो कामप्रेरणेवर भाष्य करतो आणि ते या तिघांच्या कामप्रेरणेवर प्रकाश टाकणारे ठरते. लियरचे कामप्रेरणेवरचे हे भाष्या त्याच्या मुलींच्या सत्ताप्रेरणेलाही अर्थपूर्ण बनवते. मुलींची सत्ताप्रेरणा इतरांना

अनुक्रमणिका

दु:ख देणारी, इतरांचा विनाश घडवणारी अशिव स्वरूपाची आहे. म्हणजेच ती सैतानप्रभावित आहे. या प्रेरणेवरही "सैतानाचे राज्य" आहे.

कोणतीही प्रेरणा असो तिचे एक जनावरांच्या पातळीवरचे, एक सैतानाच्या पातळीवरचे आणि एक ईश्वरी पातळीवरचे अशी तीन रूपे असतात. इतरांचे अकल्याण, विनाश न घडवता जी सत्ताप्रेरणा स्वत:ची तृप्ती घडवते ती जनावराच्या पातळीवरची; जी तृप्तीच्या प्रक्रियेत इतरांचे अकल्याण घडवून आणते ती सैतानप्रभावित पातळीवरची आणि जी मानवाच्या कल्याणात, रक्षणात, तृप्ती शोधते ती ईश्वरप्रभावित सत्ता; असे लियरच्या कामप्रेरणेवरील भाष्यातून सूचित होते. लियरच्या ठिकाणच्या पशुपातळीवरील सत्ताप्रेरणेचे उन्नयन होऊन ती ईश्वरप्रभावित पातळीवर जाते. गॉनरिल-रीगन-एडमंड यांची सैतानप्रभावित सत्ता-प्रेरणा त्यांच्यासह अनेकांचा विनाश घडवून आणते. अशा प्रकारची सत्ताप्रेरणेची तीन रूपे या नाटकात प्रकट होतात.

राजावरील आदरभाव व्यक्त करण्यासाठी ग्लॉस्टर जेव्हा लियरच्या हाताचे चुंबन घेऊ लागतो तेव्हा आपण चारचौघांसारखेच सामान्य जन आहोत हे जाणवलेला लियर त्याला म्हणतो, "मला तो प्रथम पुसू दे; त्याला आहे नश्वरतेचा वास." (४.६.१६३) 'माणूस' म्हणून आपण नश्वर आहोत, पण प्रजेचे कल्याण साधणारी मूल्यात्मक सत्ता मात्र नश्वर नाही. आदरभाव राजपदावर असलेल्या 'नश्वर' माणसाचा नव्हे तर या माणसात स्थापित झालेल्या 'चिरंजीव' मूल्यात्मक सत्तेचा करायला पाहिजे. आपल्या हाताला 'नश्वर' लियरचा असलेला वास पुसून टाकून लियर त्याला चिरंजीव सत्तेचा हात बनवू पाहतो आहे.

लियरचे मन मूल्यात्मक, विधायक, कल्याणकारी सत्तेच्या कल्पनेने व्यापलेले आहे. त्यामुळे पारंपरिक, प्रस्थापित दंडशक्तीची न्याय्यता आणि गुन्ह्याबद्दलची मानवी समजूत यांवरचा त्याचा विश्वास आता उडालेला आहे. दंडशक्तीविषयीच्या या पारंपरिक भूमिकेतून त्याने कॉर्डीलिआला आणि केंटला शिक्षा केलेली असते. त्यावेळचे आपले निर्णय चुकले होते हे आता त्याला जाणवले आहे. न्याय-अन्याय, गुन्हे यांबद्दलची आपली आकलने नुसतीच चुकीची नसतात तर त्यांमागे आपले छुपे हितसंबंधही दडलेले असतात; त्यामुळे आपण न्याय देण्याच्या नावाखाली अन्यायच करीत असतो; असे आता लियरला वाटायला लागते. न्याय-अन्याय आणि गुन्हे यांबद्दलची भासदृश्ये लियरपुढे साकार व्हायला लागतात. "डोळ्यांनी दिसत नसेल तर कानांनी पहा" असे ग्लॉस्टरला सांगून तो या भासदृश्यांचे वर्णन करू लागतो. एक न्यायाधीश सामान्य चोराला शिव्या घालत असल्याच्या त्याला दिसणाऱ्या दृश्यावर तो भाष्य करतो की, "कर त्यांच्या जागांची अदलाबदल... आता न्यायाधीश कोणता नी चोर कोणता?" (४.६.१६४) एखाद्याला चोरी करावी लागणे आणि दुसऱ्या एखाद्याला त्याच्या या गुन्ह्याबद्दल त्याला शिक्षा देण्याचा अधिकार प्राप्त होणे, याला मानवाने निर्माण केलेली व्यवस्थाच जबाबदार आहे. मुळातल्या नैसर्गिक अवस्थेत ती अस्तित्वातच नाही. त्यामुळे तेथे चोरही संभवत नाही आणि न्यायाधीशही संभवत नाही, असे येथे लियर सुचवतो आहे. तो ग्लॉस्टरला विचारतो, "तू एखाद्या शेतकऱ्याचा कुत्रा भिकाऱ्यावर भुंकताना पाहिला आहेस?... आणि तो माणूस कुतरड्यापासून दूर पळताना? त्याच ठिकाणी तुला दिसेल अधिकारपदाचे महान प्रतीक : अधिकारपदावरील एखाद्या कुत्र्याचाही मानतात हुकूम." (४.६.१६४) मानवनिर्मित व्यवस्थेत अधिकारपद मिळवायला माणसाच्या अंगी मूल्यात्मकता आवश्यक असतेच असे नाही. त्यासाठी 'जोराने भुंकता येणे' आणि मालकांपुढे शेपटी हलवण्याची खुशामतखोरीही पुरेशी असते.

आता लियरला एक हवालदार एका वेश्येला मारहाण करीत असल्याचे दृश्य दिसू लागते. लियर त्याला मारहाण करण्यास मनाई करतो. आणि म्हणतो, "ज्या करता तिला मारतोस, त्याच करता तिला वापरण्यासाठी तुझी वासना आहे वखवखलेली." (४.६.१६४) येथेही शेवटी गुन्हेगार कोण? दंड करण्याचा अधिकार असलेल्या हवालदाराला जर ती वेश्या भोगण्यासाठी हवी असेल आणि अशा प्रकारे तिचा भोग घेऊन जर तो तिचे वेश्यापण टिकवणार असेल तर पोटासाठी बेकायदेशीर वेश्याव्यवसाय करणारी ती वेश्या गुन्हेगार कशी? येथेही मानवनिर्मित व्यवस्थेमुळेच गुन्हा घडत असल्याचे लियर सूचित करतो. माणसाने निर्माण केलेली व्यवस्था ही काही जणांना जगण्यासाठी गुन्हा करायला भाग पाडते आणि नंतर गुन्हा केल्याबद्दल त्याला शिक्षा भोगायलाही भाग पाडते. ही मानवनिर्मित व्यवस्था न्यायाच्या नावाखाली दुहेरी अन्याय करणारी आहे. या व्यवस्थेवर भाष्य करताना लियर म्हणतो, "फाटक्या कपड्यामधून पडतात दृष्टीला लहानलहान अवगुणही; अंगरखे आणि महावस्त्रे लपवतात सर्व, घाला पापावर सोन्याचे चिलखत आणि न्यायासनाचा समर्थ भालाही जातो मोडून इजा केल्याशिवाय;



अनुक्रमणिका

घाला लक्तरे आणि एखाद्या ठेंगूची काडीही जाते आरपार. गुन्हा नसतो कुणीही करीत, कुणीही, मी सांगतो कुणीही; मीच देईन त्यांना प्रमाणपत्र; मित्रा हे घे; मला आहे ही सत्ता आरोप करणाऱ्यांचे ओठ शिवण्याची". (४.६.१६४) राजा असून सामान्य पददलितांशी समरस झालेल्या लियरला आर्थिक विषमतेची नवी जाण आली आहे. न्यायाच्या नावाखाली केवळ पददलितच भरडले जातात हे त्याला समजून आले आहे. आपले राजेपण, सत्ताधारीपण न विसरलेला लियर, आर्थिक विषमतेमुळेच केवळ गुन्हेगारीचा पददलितांवर आरोप करणाऱ्यांचे ओठ शिवण्याची 'सत्ता' आपल्याकडे असल्याचे अभिमानाने सांगतो. आपण जेव्हा जन्मतो तेव्हा आपण रडतो. कारण आपण "मूर्खांच्या महान रंगमंचावर" आल्याचे दुःख आपल्याला झालेले असते. (४.६.१६५) मानवनिर्मित समाज हा "मूर्खांचा रंगमंच" असल्याची टीका लियर करीत आहे.

असे शहाणपण बोलून दाखवत असताना लियरला वेडाचा झटका येतो. आपल्या मुलींना शासन करण्याचा त्याचा विचार बळावतो. तो म्हणू लागतो." हे शिरोभूषण फार झकास! घोडदळाच्या एका तुकडीला न वाजणारे नाल बसवण्याचा हा डाव फार चतुराईचा; मी त्याचाच करणार प्रयोग आणि मग एकदा का मी चाहूल न लागता जावयांना गाठले की, मग धरा मारा, धरा मारा, धरा मारा, धरा मारा!" (४.६.१६५) वादळाच्या घटनेनंतर बदललेला लियर वनस्पतींचा किंवा फुलांचा 'नैसर्गिक' मुकुट वापरतो आहे. हे 'शिरोभूषण' त्याला फार 'झकास' वाटते. ते आता लियरच्या सत्तेसंबंधीच्या बदललेल्या कल्पनांचे प्रतीक आहे. सत्तेसंबंधीच्या बदललेल्या कल्पना घेऊन तो आता मुलींवर आक्रमण करणार आहे; त्यांच्यावर सूड उगवण्यासाठी नव्हे तर त्यांनी अपत्य-पितृ-प्रेमसंबंधांचा ईश्वरदत्त दंडक मोडल्याबद्दल त्यांना शासन करण्यासाठी.

औषधोपचारासाठी लियरला नेण्यासाठी सेवक जेव्हा येतात तेव्हा लियर त्यांना म्हणतो. "माझा जन्म झाला आहे दैवाच्या क्रीडेसाठी. मला चांगली वागणूक द्या; तुम्हांला खंडणी दिली जाईल. मला शस्त्रवैद्य उपलब्ध होऊ देत; माझ्या मेंदूला घाव घालणारे." (४.१.१६५) आपण राजे असल्यामुळे खंडणी दिल्याशिवाय आपली सुटका होणार नाही आणि आपण राजे आहोत म्हणून आपल्याला पकडणाऱ्या शत्रूने चांगलेच वागवले पाहिजे; हे लियर येथे सूचित करतो. आपले राजेपण तो क्षणभरही विसरत नाही. तसेच लियरची जिजीविषाही शाबूत आहे. आपल्या मेंदूवर इलाज होऊन बरे होण्याची त्याची इच्छा आहे.

ब्रिटीश फौज कॉर्डीलिआच्या फौजेचा पराभव करते. लियर आणि कॉर्डीलिआला अटक होते. या घटनेने लियरमधील परिवर्तनाची प्रक्रिया पूर्ण होते. त्याची सतत जिवंत राहिलेली सत्ताप्रेरणा संपूर्ण नाहीशी होते. सत्ता हेच जीवन आणि सत्ता हेच व्यक्तिमत्त्व असलेल्या लियरला आता जगण्यासाठी नवे उद्दिष्ट गवसले आहे. आता कसे जगायचे आणि कशासाठी जगायचे, हे त्याला पूर्णतः उमगले आहे. आपण इतर पशूंसारखेच निसर्गाचा भाग आहोत हे त्याला वादळाने शिकवले. माणसाच्या असहायतेची आणि नैसर्गिक दुबळेपणाची प्रचिती त्याला वादळाने दिली. 'राजा' असलो तरी आपण इतर सर्व माणसांसारखेच एक 'सामान्य माणूस' आहोत, हे सत्यही त्याला उमगले. सत्ता, दंडशक्ती, न्याय, अन्याय, गुन्हे या सर्व गोष्टी विषमता-मूलक समाजरचनेमुळेच निर्माण झाल्या आहेत. त्यामुळे सत्ता हे जगण्याचे नैसर्गिक उद्दिष्ट होऊ शकत नाही. निसर्गाच्या सत्तेखाली अन्य सामान्य माणसांच्या सोबत नैसर्गिक जीवन जगणे अर्थपूर्ण आहे असे त्याला आता वाटू लागले आहे. म्हणून तो कॉर्डीलिआसह तुरुंगात जाण्याचा निर्णय घेतो. या वेळी तो आपण दोघे तुरुंगात कसे जगू याविषयी जे चित्र कॉर्डीलिआसमोर उभे करतो त्यातून आपणांस बदललेल्या लियरचे संपूर्ण दर्शन होते.

लियर कॉर्डीलिआला म्हणतो, "चल, आपण दूर तुरुंगात जाऊ या : आपण दोघेच गात राहू या पिंजऱ्यामधील पक्ष्यांसारखी; जेव्हा तू आशीर्वाद मागशील, तेव्हा मीच गुडघे टेकीन आणि मागेन तुझी क्षमा. आपण अशीच जगत राहू, प्रार्थना करू, गाणी गाऊ, जुन्या पुराण्या कहाण्या सांगू, सोनेरी फुलपाखरांना हसत बसू, दरबारामधील बातम्यांविषयी गरीब अभाग्यांच्या गप्पा ऐकू; आणि त्यांच्याशी बोलू देखील — कोण हरला नी कोण जिंकला, कोण आला, कोण गेला, — आणि आपण आणू आव विश्वाचे गूढ आपल्याला समजल्याचा, जणू आपण परमेश्वराचे हेर असल्यागत; आणि आपण राहू टिकून, भिंतीने वेढलेल्या एखाद्या तुरुंगामध्ये, थोरांच्या कंपूंहून आणि गटांहून प्रत्येक महिन्याला भरती-ओहोटी लागणाऱ्या." (५.३.१७७)

ज्या राजदरबाराचा तो प्रमुख होता त्या राजदरबाराचा तो आता उपहास करतो. तेथे थोरांचे कंपू असतात, गट असतात. कधी हा कंपू वरचढ होतो आणि त्याची पिछेहाट

होते; तर कधी तो कंपू बाजी मारतो आणि याची हार होते. या राजदरबारात सतत काही ना काही घडत असते. कोणीतरी येतो; कोणीतरी जातो; कोणीतरी हरतो; कोणीतरी जिंकतो. आता आपण त्याचे भाग राहिलो नाही याचे त्याला समाधान वाटते. आता आपले आयुष्य या दरबारी श्रेष्ठींपेक्षा अधिक स्थिर, अधिक शांत असणार याचेही त्याला समाधान वाटते.

पक्षी जरी पिंजऱ्यात कोंडला तरी तो त्याचे नैसर्गिक गाणे विसरत नाही. आता आपण असेच तुरुंगात आपले नैसर्गिक गाणे गात जगू; परमेश्वराची प्रार्थना करू, जुन्यापुराण्या कहाण्या सांगू, असे लियर म्हणतो. आता त्याचा अहंकार गळून गेला आहे. कन्येने, आपण तिचे बाप आहोत म्हणून आपल्यावर असाधारण प्रेम केलेच पाहिजे, अशीही त्याची आता अपेक्षा नाही. कॉर्डीलिआ जेव्हा आपला आशीर्वाद मागेल तेव्हा आपण गुडघे टेकून तिची क्षमा मागू. आपण तिचा गुन्हा केला एवढ्याच कारणाने नाही तर आता ती आणि आपण समपातळीवर आलो आहोत म्हणून.

आपल्या हाती जर पुन्हा सत्ता आली असती तर तिच्या आधारे हे मानवी जग बदलण्याचा आपण प्रयत्न केला असता. सामान्य माणसाचे जगणे अजून तरी राजदरबाराच्या हालचालींवर अवलंबून आहे. राजमंडळच सामान्य माणसाचे भवितव्य ठरवते. त्यामुळे या सामान्य माणसांना राजदरबारात काय घडते याचे कुतूहल असते. या राजदरबारातील "सोनेरी फुलपाखरां"चे काय काय चाललेले असते आणि ते किती अनैसर्गिक आणि कृत्रिम असते हे, एकेवेळी त्यांच्यापैकी असणाऱ्या आपल्या दोघांनाही माहिती आहे. आपण आता त्यांना हसत बसू. राजदरबाराबद्दलच्या बातम्यांविषयी गरीब बिचाऱ्या तुरुंग-वासीयांच्या गप्पा ऐकू. आणि जणू आपण परमेश्वराचे हेर असल्यासारखे आणि जणू आपणांस विश्वाचे गूढ कळाले असल्याच्या थाटात आपण दरबाराविषयी त्यांच्याशी बोलूदेखील. सामान्य माणसाच्या आकलनक्षमतेच्या मर्यादा कळालेला लियर, आपण सर्वज्ञ असल्याचा आव आणण्याच्या मानवी प्रवृत्तीचा उपहासही करतो.

लियरचे वेड आता पूर्णपणे नाहीसे झाले आहे. कॉर्डीलिआच्या प्रेमाचा साक्षात्कारही त्याला झाला आहे. राजबंदी बनलेल्या कॉर्डीलिआला आता फ्रान्सची राणी म्हणून परतता येणार नाही, हेही आता त्याला उमगले आहे. तिच्याशी आपले नाते तोडताना तो केंटला म्हणाला होता, "तीच होती सगळ्यात लाडकी आणि तिच्याच लालनपालनासाठी ठरविले होते सर्वस्व वेचायचे." (१.१.७५) हे आता राजवाड्यात नव्हे तर तुरुंगात खरे होणार होते. आपल्या वाट्याला नियतीकडून जे आले आहे आणि जे अटळ आहे ते समजूतदारपणे आता तो स्वीकारीत आहे. हे स्वीकारीत असताना तो तुरुंगात एका निरागस, सामान्य माणसाचे जीवन जगायचे स्वप्न पाहतो आहे.

लियरच्या या स्वप्नाचे नाते त्याच्या न्याय-अन्यायाबद्दलच्या बदललेल्या कल्पनांशी आहे. जे या समाजरचनेत गुन्हेगार म्हणून ओळखले जातात ते मुळात गुन्हेगार नसतातच; तर ते दूषित, अपुऱ्या समाजव्यवस्थेचे बळी असतात. लियर ज्या तुरुंगात राहणार आहे तेथे 'गुन्हेगार' म्हणून ठरवले गेलेले अनेकजण असणार. ही माणसे मुळात निरागस, सामान्य माणसेच असणार. राजे असलेले आपण आणि आपली कन्या आज असेच 'गुन्हेगार' ठरलो आहोत. मुलींना आपले राज्य वाटून देणे आणि आपल्या निवृत्तीनंतर "राजा" म्हणून त्यांनी आपली प्रतिष्ठा ठेवावी अशी अपेक्षा बाळगणे, तसेच बापाच्या होणाऱ्या छळातून त्याची सुटका करण्यासाठी कन्येने फौज घेऊन धावून येणे, हे काही "गुन्हे" नव्हते. परंतु या समाजव्यवस्थेत मात्र हे गुन्हे ठरले. ज्यांच्या जीवनात सतत भरती-ओहटी येत असते अशांच्या वर्गातल्या आपल्या जीवनात या क्षणी 'ओहटी' आली आणि गॉनरिल-रीगन यांच्या जीवनात मात्र 'भरती' आली. भरती आलेले साव ठरले आणि ओहटी आलेले आपण गुन्हेगार ठरलो. आपण हे समजूतदारपणे स्वीकारीत आहोत आणि समाधान याचेच की कैदी म्हणून जगताना आपल्या जीवनात यानंतर अशी भरती-ओहटी येणार नाही. आपण येथून पुढे कैदी म्हणूनच टिकून राहू. लियर येथे भावी जीवनाचे जे स्वप्न उभे करतो त्यामागे हा सर्व विचार सूचित केला गेला आहे. परंतु जगायचे कसे याचे आकलन झालेल्या लियरला तसे जगायची संधीच मिळत नाही. माणसाला जेव्हा कसे जगावे याचे ज्ञान होते तेव्हा त्याचे जगणेच नाकारले जाते; यातील विपरीतता शेक्सपियर या नाटकात प्रकट करताना दिसतो.

पददलित मुळात गुन्हेगार नसतात; विषमतामूलक समाज-रचनाच त्यांना 'गुन्हा' करायला प्रवृत्त करते हे ज्या पददलितांबद्दल लियर म्हणतो त्या पददलितांपैकी एक जमादार कॉर्डीलिआला फाशी देण्याचे काम करतो! एका दरिद्री जमादाराला आर्थिक आमिष दाखवून एडमंड त्याला कॉर्डीलिआ आणि लियर यांना ठार करण्याचे काम सांगतो. हे काम स्वीकारताना दरिद्री

जमादार म्हणतो, "मला नाही ओढवणार खटारा किंवा खाववणार सुके सातू; पण काम माणसाचे असेल तर अवश्य करीन." (५.३.१७८) माणसाला ठार मारणे हे माणसाचेच काम असल्याचे त्याला येथे म्हणायचे आहे!

युद्ध जिंकल्यावर कॉर्डीलिआ व लियर यांना परस्पर ठार करण्याची आज्ञा देणे हा एडमंडचा केवळ दुष्टपणा नाही. तो त्याच्या राज्यप्राप्तीच्या उद्दिष्टपूर्तीचा एक अपरिहार्य भागच आहे. जर हे दोघे जिवंत राहिले तर एडमंडचे राज्यप्राप्तीचे उद्दिष्टच नव्हे तर त्याचे अस्तित्वच धोक्यात आले असते. फ्रान्सबरोबरचे युद्ध जरी एडमंडने जिंकून दिले असले तरी लियरचा जावई आणि अर्ध्या राज्याचा राजा असलेल्या ऑल्बनीलाच लियर व कॉर्डीलिआ या युद्धकैद्यांबद्दल अंतिम निर्णय घेण्याचा अधिकार होता. त्याला लियरबद्दल नितांत आदर असल्यामुळे त्याने लियरला सन्मानाने मुक्त केले असते, याची एडमंडला कल्पना आहे. तो ऑल्बनीबद्दल म्हणतो, "त्याच्या मनात आहे इच्छा लियर आणि कॉर्डीलिआ या दोघांना दया दाखवण्याची; लढाई संपू दे आणि येऊ देत आमच्या वर्चस्वाखाली, नाही घडणार ज्याच्या माफीचे त्यांना दर्शनही." (५.१.१७६) ऑल्बनीचा काटा काढून दोघी बहिणींपैकी एकीशी लग्न करून आणि दुसरीवर आक्रमण करून संपूर्ण इंग्लंडची सत्ता आपल्या ताब्यात घेण्याची त्याची योजना लियर जर जिवंत राहिला तर फलद्रूप होणे शक्य नव्हते. कदाचित कॉर्डीलिआला तिचा वाटाही दिला गेला असता आणि एडमंडची उद्दिष्टपूर्ती अधिकच अवघड झाली असती. तेव्हा लियर-कॉर्डीलिआला ठार करण्याच्या एडमंडच्या योजनेमागे केवळ दुष्टपणा नाही तर प्रबल अशी सत्ताप्रेरणाही आहे.

जेव्हा सत्ता मूल्यविहीन रूप धारण करते तेव्हा अराजकाला प्रारंभ होतो; हे एक आशयसूत्र *राजा लियर* मध्ये असल्याचा उल्लेख यापूर्वी केला होता. *राजा लियर* ही एका राजाची शोकांतिका आहे. एका राज्याची नाही. शेक्सपियरला ती केवळ एका राजापुरती सीमित करायची आहे. या दृष्टीने शेक्सपियरने या नाटकाचा शेवट केला आहे. लियरच्या संपूर्ण कुटुंबाच्या विनाशानंतर इंग्लंडचा राजा बनणाऱ्या ऑल्बनीचे चित्र रंगविताना शेक्सपियरने त्यात अनेक मूल्यांचे, नेतृत्वगुणांचे आणि मुत्सद्दी-पणाचे रंग भरले आहेत.

नाटकाच्या प्रारंभीच्या भागात ऑल्बनीची व्यक्तिरेखा फिकट रंगांनी रेखाटली आहे. प्रारंभीच्या भागात तो आपल्या नजरेत भरत नाही. नाटकाच्या शेवटच्या भागात मात्र ही व्यक्तिरेखा अनेक चमकदार रंगांनी उजळून निघते.

प्रारंभी ऑल्बनी गॉनरिल-लियरच्या संघर्षात लक्ष घालत नाही. गॉनरिलही त्याला आपल्या धोरणांबाबत विश्वासात घेत नाही; त्याच्याशी सल्लामसलत करीत नाही. लियरबद्दल आपला आदरभाव प्रकट करीत गॉनरिलच्या त्याच्याशी होणाऱ्या वर्तनाबद्दल तो फक्त नापसंती प्रकट करतो. गॉनरिलचे त्याच्यावर प्रेम नाही; त्याच्या मूल्यनिष्ठेबद्दल तिच्या मनात घृणा आहे. "भागूबाई", "नीतिबाज महामूर्ख" अशा शब्दांतून ती त्याच्याबद्दलची आपली घृणेची भावना प्रकट करते. एक चांगल्या स्वभावाचा, अलिप्त वृत्तीचा, लियरबद्दल आदर बाळगणारा नरेश, अशीच प्रारंभी त्याची प्रतिमा आपल्या मनावर उमटते.

फ्रेंच सैन्याशी लढण्यासाठी तो जेव्हा डोव्हरला येतो तेव्हा तो फ्रेंच आक्रमणाबद्दल आणि लियरवरील अन्यायाबद्दल आपली भूमिका स्पष्ट करतो. जेथे आपल्या प्रामाणिकपणाला वाव नसतो तेथे आपण आपला शूरपणा दाखवत नसतो, असे तो आपल्या आतापर्यंतच्या निष्क्रीयतेचे स्पष्टीकरण देतो. (५.१.१७४) आपल्या प्रामाणिकपणाबद्दल — आपण गॉनरिलचे पती असल्यामुळे — लियरला विश्वास वाटत नसणार. आपल्याला लियरबद्दल आदर वाटतो म्हणून गॉनरिललाही आपल्या प्रामाणिक-पणाबद्दल विश्वास वाटत नसणार. दोघांचाही आपल्यावर विश्वास नसल्याने या दोघांच्या संघर्षाने आपण तटस्थ राहिलो, असे त्याला म्हणायचे आहे. परंतु आता फ्रान्सनेच आपल्या देशावर आक्रमण केल्यामुळे त्या आक्रमणाविरुद्ध या संघर्षात आपल्याला उतरणे भाग आहे असाही खुलासा तो करतो. परंतु आपला संबंध या आक्रमणाला विरोध करण्यापुरताच आहे; आपला लियरला विरोध नाही; हे स्पष्ट करताना तो म्हणतो, "त्यांचा उठाव, माझ्या कल्पनेनुसार, आहे झालेला अत्यंत न्याय्य आणि गंभीर अशा कारणासाठी". (५.१.१७४) फ्रान्सचे आक्रमण परतवून लावल्यावर आपण लियरला न्याय मिळवून देऊ हे तो आपल्या बोलण्यातून सूचित करतो. लियरवरच्या अन्यायाचा प्रश्न आणि फ्रेंच आक्रमणाचा प्रश्न वेगवेगळे करून ते स्वतंत्रपणे सोडवण्याच्या त्याच्या भूमिकेमागे त्याचे मूल्यनिष्ठ, विवेकी आणि प्रगल्भ राजकारण दिसून येते.

युद्धासाठी डोव्हरला आल्यावर त्याच्या हातात गॉनरिलचे एडमंडला लिहिलेले, ऑल्बनीचा काटा काढून टाक, आपण लग्न करू, असा आशय असलेले प्रेमपत्र पडते. आपल्या

पत्नीचा धक्कादायक इरादा कळूनही तो आपल्या मनाचा तोल जाऊ देत नाही. हे कळूनही जो एडमंडशी आणि गॉनरिलशी संयमाने वागतो आणि उचित क्षण येताच याचा स्फोट घडवून आणतो. येथेही त्याच्या प्रगल्भ मुत्सद्दीगिरीचे दर्शन होते.

एडमंड-ऑल्बनीच्या नेतृत्वाखाली इंग्लंडची फौज फ्रान्सच्या फौजेचा पराभव करते. इंग्लंडचा जय झाल्यावर ऑल्बनी एडमंडचे कौतुक करताना म्हणतो, "आज तुम्ही दिलात दाखवून तुमच्याकडे आलेला शौर्याचा वारसा, आणि दैवानेही दिलान तुम्हांला चांगलाच हात..." (५.३.१७८) हे कौतुक एका परीने एडमंडचा अपमान आहे. एडमंडच्या पराक्रमाचे श्रेय त्याला नव्हे तर त्याच्या पित्याला—ग्लॉस्टरला — आणि दैवाला दिले जात आहे. ऑल्बनी एडमंडचा हा अपमान जाणीवपूर्वक करतो. ऑल्बनीला जगातून नाहीसे करून एडमंडशी लग्न करण्याचा आपल्या बायकोचा इरादा ऑल्बनीला कळालेला आहे. आपल्या कटाचे ज्ञान ऑल्बनीला आहे हे गॉनरिलला माहीत नाही आणि गॉनरिलशी आपले प्रेमसंबंध असल्याचे ऑल्बनीला माहीत आहे हे एडमंडला माहीत नाही. त्यामुळे या तिघांचे जे एकमेकांशी संभाषण होते ते विपरीतभावाचा आणि म्हणून नाट्याला प्रत्यय देणारे झाले आहे. गॉनरिल-एडमंड बोलताना सावपणाचा आव आणीत आहेत आणि आपल्याला गॉनरिल-एडमंडबद्दल काहीच माहीत नसल्याचे नाटक ऑल्बनी करीत आहे. एडमंडचा पाणउतारा होईल असे ऑल्बनी म्हणूनच बोलत आहे. आपण एका कर्तृत्ववान माणसाची बाजू घेत आहोत असे दर्शवित गॉनरिल एडमंडवरचे आपले प्रेम फक्त त्यालाच कळावे अशा पद्धतीने त्याची बाजू घेताना बोलत आहे. तिच्या या बोलण्यातून तिचे एडमंडवरचे प्रेम प्रकट होत असल्याचे ऑल्बनीला स्पष्ट दिसते.

लियर-कॉर्डीलिआला आमच्या ताब्यात द्या असे जेव्हा ऑल्बनी एडमंडला फर्मावतो तेव्हा, या दोघांच्या प्रश्नाकरता योग्य स्थलकालासाठी थांबावे लागेल, असे एडमंड उत्तर देतो. आपली आज्ञा ठोकरून केव्हा काय करायचे याचा निर्णय एडमंड घेतो आहे हे अर्थात ऑल्बनीला अपमानास्पद वाटते. "महाशय, जरा सबूर, मी आपणांला या लढाईतील एक दुय्यम एवढेच समजतो, माझ्या बरोबरीचा असे नव्हे." (५.३.१७९) असे ऑल्बनी एडमंडला फटकारतो. आपल्या प्रियकराचा होणारा हा अपमान गॉनरिल आणि रीगन या दोघींनाही सहन होत नाही. एडमंडची बाजू घेण्याची दोघींची स्पर्धा सुरू होते. एडमंडला आपल्याकडे ओढण्यात गॉनरिल यशस्वी होईल या भीतीपोटी घाईघाईने, 'आपण एडमंडशी लग्न करणार' असल्याचे रीगन जाहीर करते. यावर अस्वस्थ झालेली गॉनरिल "तू त्यांना वरणार की काय?" असा प्रश्न विचारते. ऑल्बनी गॉनरिलला म्हणतो, "त्याचा प्रतिबंध तुमच्या सदिच्छेच्या अखत्यारात नाही. ही ऑल्बनीचा अपमान करण्याची चांगली संधी आहे हे पाहून एडमंड म्हणतो, "आणि सरकार, आपल्याही." एडमंडने आक्रमक होऊन आपला अपमान करावा म्हणजे त्या निमित्ताने एडमंडचे खरे स्वरूप आपल्याला उघड करता येईल, याची वाट पाहणारा ऑल्बनी याच क्षणी त्याला हवा असलेला स्फोट घडवून आणतो. तो म्हणतो, "अनौरस प्राण्या, आहे.... एडमंड महाशय, मी आपणांला करतो अटक खुनी राजद्रोहाबद्दल." आणि गॉनरिलकडे बोट दाखवीत तो म्हणतो, "आणि आपल्या खटल्याच्या संदर्भात या सोनेरी नागिणीलाही." (५.३.१८०) एवढेच नाही तर एडमंडशी लग्न करण्याचा रीगनचा निर्णय आपल्याला नामंजूर असल्याचे सांगताना तो म्हणतो, "मी करतो तो नामंजूर माझ्या पत्नीचा हितसंबंध लक्षात घेऊन; ती आहे, विवाहित असूनही या उमरावाशी वचनबद्ध झालेली आणि मी, तिचा नवरा, घेतो आक्षेप तुमच्या लग्नसंकल्पाला." (५.३.१८०) त्याच्या या बोलण्यात एडमंड-गॉनरिलच्या मूल्यविहीन, पाशवी वर्तनाचा उपहास आहे. तो येथेच थांबत नाही. आपल्या बापाचा छळ करणारी आणि एडमंडसारख्या गुन्हेगार प्रवृत्तीच्या व्यक्तीवर प्रेम करणारी रीगनही कशी जनावरासारखी आहे, हे तो आपल्या उपहासपर बोलण्यातून दर्शवितो. तो म्हणतो, "तुम्हांला विवाह कर्तव्य असल्यास, तुम्ही माझेच करा प्रियाराधन, माझी पत्नी आहे वचनबद्ध." (५.३.१८०)

टुकार टॉमच्या वेषातील एडगरने आपल्या भावाशी द्वंद्वयुद्ध करून त्याला राजद्रोहाबद्दल ठार करायचे ठरवलेले असते. जर तो वेळेवर आला नाही तर आपण द्वंद्व करू असे ऑल्बनी जाहीर करतो. तो म्हणतो, "राहा विसंबून फक्त आपल्या एकट्याच्या शौर्यावर; कारण माझ्या हुकुमाबरहुकूम भरती झालेले तुझे सैनिक झालेत सेवामुक्त माझ्याच हुकुमानुसार" (५.३.१८९) एडमंडच्या कपटी वृत्तीचा अंदाज ऑल्बनीने घेतला आहे. आपण जेव्हा त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप करू तेव्हा तो आपल्या पदरी असलेल्या सैन्याच्या आधारे आपल्यावर चढाई करू शकेल म्हणून ते सैन्य बरखास्त करून त्याने एडमंडला एकाकी पाडले आहे. त्याच्या प्रत्येक हालचालीत

अनुक्रमणिका






योजनाबद्धता आणि मुत्सद्दीगिरी आहे. एडगरला बोलावण्यासाठी तुतारीचा नाद केला जातो. एडगर येऊन द्वंद्वात एडमंडला प्राणांतिक जखमी करतो. गॉनरिल "हे कपटकारस्थान आहे". असा आरोप करते. ऑल्बनी तिलाच तिने नवऱ्याविरुद्ध रचलेल्या कपटकारस्थानाचे पत्र दाखवतो. कोंडीत सापडलेली गॉनरिल आत्महत्त्या करते. गॉनरिलने आधीच विष दिलेली रीगनही मरते. एडमंडला आणि गॉनरिलला योजनाबद्ध रीतीने कोंडीत पकडून त्यांना ऑल्बनी शासन करतो.

मृत कॉर्डीलिआला हातांवर घेऊन जेव्हा लियर प्रवेश करतो तेव्हा ऑल्बनीच्या व्यक्तिमत्त्वातील आणखी एका विशेषाचे दर्शन घडवले जाते. लियर हयात असेपर्यंत त्याच्याकडे राज्याची सत्ता राहील; आपण आपली सत्ता लियरसाठी सोडीत असल्याचे तो जाहीर करतो. कॉर्डीलिआच्या मृत्यूच्या दुःखाने लियरचा अंत होतो तेव्हा लियरच्या राज्याची सत्ता केंट आणि एडगरने सांभाळावी असेही जो जाहीर करतो. आपण आपल्या धन्याच्या — लियरच्या — मागे जाणार असे जाहीर करून आपणही मृत्यू स्वीकारणार असल्याचे केंट सूचित करतो. शेवटी ऑल्बनी आणि एडगर दोघेच उरतात. ऑल्बनीकडे जरी सत्ता आपोआप येणार असली तरी त्याला सत्तेचा मोह नसल्याचे दर्शवून त्याची मूल्यनिष्ठा शेक्सपियरने अधिकच बळकट केली आहे.

शूर, संयमी, मुत्सद्दी आणि राजकारणात मूल्यांची प्रतिष्ठा सांभाळणाऱ्या ऑल्बनीकडे इंग्लंडची सत्ता जाते आणि देश अराजकाच्या दुःस्वप्नातून वाचतो हे सूचित करून सत्ताप्रेरणेच्या या शोककारक नाट्याला राष्ट्राच्या सुखद भवितव्याची एक किनार शेक्सपियरने प्राप्त करून दिली आहे.

आतापर्यंत आपण नाट्यांतर्गत व्यक्तींच्या प्रेरणांचा, मूल्यांचा आणि प्रेरणांमधील संघर्षाचा तसेच या सर्वांतून जन्मणाऱ्या नाट्याचा आणि जाणिवांचा विचार केला. आतापर्यंतच्या विवेचनाचा सारांश पुढीलप्रमाणे मांडता येईल.

१. *राजा लियर* हे नाटक सत्तासंघर्षातून आकार धारण करते. हा सत्तासंघर्ष मूल्यविहीन सत्ताप्रेरणा आणि मूल्यसंलग्न सत्ताप्रेरणा यांच्यात घडून येतो. या सत्तासंघर्षाचे पर्यवसान लियर व कॉर्डीलिआ यांच्या विनाशात होते.

२. या नाटकात मूल्यविहीन सत्ताप्रेरणा फलद्रूप करण्यासाठी तिच्याशी शृंगारप्रेरणा संलग्न केली जाते आणि ती साधनासारखी वापरली जाते. त्यातून गॉनरिल-रीगन आणि एडमंड यांचा विनाश घडून येतो.

३. मूल्यविहीन सत्ताप्रेरणेची अखेरच्या क्षणापर्यंत सरशी होत गेल्यामुळे एक अराजकसदृश परिस्थिती निर्माण होते.

४. हा विनाश घडत असताना ऑल्बनी-एडगर यांच्या रूपाने नव्या मूल्यसंलग्न सत्तेचा उदय होऊन अराजकाचा धोका टळतो.

५. या सत्तासंघर्षात संपूर्ण सृष्टीत मानवाचे आणि मानवी सत्तेचे स्वरूप आणि स्थान काय, माणसाच्या जगण्यातील अर्थपूर्णता कशात आहे, असे काही प्रश्न उभे राहतात आणि त्यासंबंधीच्या जाणिवा या नाटकातून प्रकट केल्या जातात.

६. यासाठी शेक्सपियरने यात सत्तेची तीन रूपे साकार केली आहेत. यांपैकी मानवी सत्तेच्या दोन रूपांचा वर उल्लेख आला आहेच. या नाटकातील सत्तेचे तिसरे रूप नैसर्गिक-प्राकृतिक सत्तेचे असून ती मूलभूत, अंतिम आणि निर्णायक सत्ता आहे. या नाटकात ती पंचमहाभूतांच्या प्रक्षुब्ध, वादळी रूपात प्रकट होते. ही सत्ता अंध असून दंड देताना ती सजीव-निर्जीव, वनस्पती-प्राणी, सत्ताधीश-प्रजा, चांगले-वाईट, सज्जन-दुर्जन असा कुठलाही भेद करीत नाही. तिच्या तावडीत सापडणाऱ्या सर्वांचा ती विनाश घडवून आणते. या सत्तेला स्वतःचे असे उद्दिष्ट नाही; ती फक्त 'असते'.

७. या सत्तेच्या साक्षात्कारामुळे लियरच्या संवेदनशीलतेत, जीवनदृष्टीत आणि व्यक्तिमत्त्वात मूलगामी परिवर्तन होते. मानवी सत्तेचे कल्याणकारी उद्दिष्ट आणि तिच्या मर्यादा यांची त्याला जाणीव होते. मानवाचे कल्याण साधण्यासाठी सत्ता वापरण्याची नवी सत्ताप्रेरणा त्याच्या ठिकाणी जागृत होते. पण त्याच्या विनाशामुळे त्याला ही संधी मिळत नाही.

या अंतिम सत्तेचा साक्षात्कार झाल्यावर त्याला पुढील गोष्टींचे ज्ञान होते.

१. सृष्टीच्या अंतिम, निर्णायक सत्तेच्या अधिपत्याखाली मानवी जीवनाचे आणि मानवी सत्तेचे अस्तित्व आहे.

२. इतर पशुपक्ष्यांप्रमाणे आपल्या नैसर्गिक गुणधर्मांच्या साह्याने सृष्टीच्या अधिपत्याखाली राहण्यातच मानवी जीवनाची सार्थकता आहे.

३. नैसर्गिक-प्राकृतिक सत्तेच्या उद्रेकप्रसंगी हिंस्र प्राण्यांनाही आपल्या रक्षणाची सोय उपलब्ध असते. परंतु मानवनिर्मित

अनुक्रमणिका

व्यवस्थेच्या विकृत रूपामुळे अशी सोय प्रत्येक माणसाला उपलब्ध होत नाही. विषमतामूलक मानवी व्यवस्थेमुळे काहींच्या जवळ जीवनावश्यक वस्तूंची अतिरिक्तता तर काहींच्या जवळ संपूर्ण अभाव अशी परिस्थिती निर्माण होते.

४. अभावग्रस्त माणसांना जीवनावश्यक सोयी उपलब्ध करून देणे, त्यांचे संरक्षण करणे हे मानवी सत्तेचे उद्दिष्ट आहे.

५. नैसर्गिक अवस्थेतील माणूस हा मुळात गुन्हेगार नसतो. नैसर्गिक नियमांना डावलून घडवलेल्या संस्थांमुळे आणि त्यातून जन्मलेल्या विषमतेमुळे जगण्यासाठी त्याने केलेली कृती 'गुन्हा' ठरते. ही व्यवस्था विषमतेचा बळी ठरलेल्या माणसाला जगण्यासाठी आवश्यक असलेले काहीही मिळू देत नाही. हा त्यांच्यावर केलेला अन्यायच असतो. जगण्यासाठी त्याने केलेली कृती गुन्हा ठरवून त्याला शिक्षा केली जाते. अशा माणसांवर ही व्यवस्था दोनदा अन्याय करीत असते.

६. पददलितांना योग्य न्याय देण्यासाठी लियरला पुन्हा सत्ता हवी असते. परंतु युद्धात त्याचा पराजय होऊन तो युद्धकैदी ठरतो. या घटनेमुळे त्याची सत्ताप्रेरणा नाहीशी होते. परंतु त्याबरोबर त्याला जगायचे कसे आणि कशासाठी याचे ज्ञानही झालेले असते.

७. मानवी व्यवस्थेने गुन्हेगार ठरवून तुरुंगात डांबलेल्या सामान्य माणसांच्या सहवासात कॉर्डीलिआसमवेत गाणी गात, गोष्टी सांगत एक नैसर्गिक, निरागस जीवन जगण्याचे स्वप्न लियर पाहतो.

परंतु कॉर्डीलिआला फाशी दिल्यानंतर दुःखाने मरण पावलेल्या लियरचे हे स्वप्नही प्रत्यक्षात येत नाही.

८. *राजा लियर* या नाटकातील जाणीवव्यूह हा रोमँटिक संवेदनशीलतेच्या परंपरेतील आहे.

- ८ -

*राजा लियर* या नाटकाची अर्थपूर्णता खूपच संदिग्ध आहे. जीवनाच्या अर्थपूर्णतेबद्दल किंवा जीवनासंबंधीच्या जाणिवांबद्दल नेमकी विधाने या नाटकात आढळत नाहीत. जी अस्पष्ट असलेली, लियरचा आणि टुकार टॉमचा वेडेपणा दर्शविणारी विधाने येतात — आणि ती जरी खोलवर अर्थपूर्ण असल्याचे आपणांस जाणवत असले तरी — ती परस्परांशी जोडली गेली नसल्यामुळे त्यातून सलग अशी अर्थपूर्णता स्पष्टपणे प्रकट होत नाही.

या नाटकाची रचना द्विस्तरीय स्वरूपाची आहे. त्यांपैकी पहिला स्तर अतिशय स्पष्ट असून वाचक-प्रेक्षकांना झटकन प्रत्यय देणारा आहे. परंतु त्याचवेळी हा स्तर दुसऱ्या अंतर्गत स्तराच्या अस्तित्वाची सूचनाही देणारा आहे. ही सूचना लक्षात घेऊन दुसऱ्या स्तराचे आकलन करायचे की नाही हे वाचक-प्रेक्षकांनी ठरवायचे आहे. केवळ पहिल्या स्तरावर जरी तो थांबला तरी एका परिपूर्ण नाट्यकृतीचा प्रत्यय त्याला येऊ शकतो. परंतु तो जर दुसऱ्या स्तराकडे गेला तर पहिल्या स्तरावरील रचलेल्या सर्व घटकांची नवी अर्थपूर्णता त्याला जाणवायला लागते. त्यातून जीवनासंबंधीच्या अनेक जाणिवांचा आणि अर्थपूर्णतेचा एक पट त्याच्या समोर उलगडत जातो. *राजा लियर* या नाटकाचे श्रेष्ठत्व या दुसऱ्या स्तराच्या अस्तित्वावर, त्यातून प्रकटणाऱ्या जाणिवांच्या अर्थपूर्णतेवर, व्यापकतेवर आणि वैश्विकतेवर उभे आहे.

पहिल्या स्तरावर हे नाटक एक छळकथा मांडते. लियर राजाच्या दोन दुष्ट मुलींनी त्याचा क्रूरपणे केलेला छळ, त्याच्या चांगल्या मुलीने, बापाने केलेला अन्याय विसरून, त्याच्या सुटकेचा केलेला प्रयत्न, त्यात अपयश आल्याने लियरचा आणि चांगल्या मुलीचा झालेला मृत्यू, अशी दुःखपूर्ण शेवट असलेली एक छळकथा या स्तरावर मांडली जाते. आपल्या पोटच्या मुली असल्याने आणि त्यांचे आपल्यावर खूप प्रेम असल्याचे त्यांनीच बोलून दाखवल्याने त्या आपली प्रेमाने देखभाल करतील, आपली प्रतिष्ठा सांभाळतील या विश्वासाने राजा लियर आपले राज्य दोन मुलींत वाटून देतो. तिसरी मात्र कृतघ्न असल्याचे दिसल्यावरून तो तिचा त्याग करतो. परंतु ज्यांचे आपल्यावर प्रेम आहे असे त्याला वाटते त्याच मुली त्याचा दुष्टपणे छळ करतात; तिसरी त्यागलेली मुलगी मात्र मदतीला धावून येते; अशा या रचनेचा केंद्रीय संघर्ष नैतिक पातळीवरचा आहे. या संघर्षात पात्रांची सरळ सरळ सुष्ट आणि दुष्ट, स्वामिनिष्ठ आणि स्वामिद्रोही अशी विभागणी केली आहे.

या स्तरावरच्या रचनेला रंजकमूल्यही प्राप्त करून दिले जाते. शीघ्र संतापी आणि नंतर वेडा झालेला राजा लियर; शहाणा असून वेड्याचे सोंग घेतलेला एडगर; भोळसट असलेला ग्लॉस्टर; स्वामिनिष्ठ केंट; चमकदार चतुर बोलणारा विदूषक;





अनुक्रमणिका

दुष्टपणाने काठोकाठ भरलेल्या गॉनरिल-रीगन; दुष्ट, बेरकी आणि मिठासवाणीचा एडमंड; प्रेमळ, अबोल कॉर्डीलिआ अशी आकर्षक, रंजनक्षम पात्रांची योजना या स्तरावर आढळते. या स्तरावर वेषांतर करणे, सोंग घेणे आणि ते कोणालाही ओळखू न येणे अशा क्लृप्त्यांचा वापर केला जातो. पोटच्या मुलींनी बापाचा छळ करणे, त्याला भीषण वादळात घराबाहेर काढणे, एकाचे क्रूरपणे डोळे फोडणे, द्वंद्व खेळणे आणि त्यात एकाने दुसऱ्याला ठार करणे, नवरा जिवंत असताना व्यभिचारी प्रेम करणे, प्रत्यक्ष नवऱ्याचा खून करायला प्रियकराला सांगणे, बाप व मुली यांत युद्ध घडवून आणणे अशा चित्तथरारक, संवेदना आणि भावना यांना आवाहन करणाऱ्या नाट्यपूर्ण, रंजक घटनांची मालिका या स्तरावर सादर केली जाते. अशा घटनाप्रसंगांना साजेशा संवादांचा आणि भाषेचा वापरही या स्तरावर केला जातो. वक्तृत्वपूर्ण, भावोत्तेजक, विरोधन्यासात्मक आणि विपरीतभावात्मक भाषा सर्व पात्रांच्या तोंडी घातली जाते. विदूषकाचे नर्म विनोदी भाष्य; लियरचे असंगतिपूर्ण वेडसर बोलणे; टुकार टॉमचे जाणीवपूर्ण असंगतिपूर्ण, वेडसर बोलणे; एडमंडची मिठास पण विखारी वाणी; ह्या सर्वांना रंजकनाट्यमूल्य प्राप्त झाले आहे. थोडक्यात रंजनपर नैतिक नाटक म्हणूनच केवळ स्वीकारण्याची सोय या नाटकात आहे.

या पातळीचा सलगपणा जराही बिघडू न देता या पातळीवरील काही घटक वाचक-प्रेक्षकांना दुसऱ्या पातळीकडे खेचताना दिसतात. हे पुढीलप्रमाणे घडताना दिसून येते. एक म्हणजे, असे संवाद निर्माण करायचे जे पहिल्या पातळीवरची आपली सुसंगती बिघडू न देता दुसऱ्या पातळीवरची व्यामिश्रता सूचित करतील. राज्य मिळाल्यावर गॉनरिल-रीगनमधील संवाद याच प्रकारचा आहे. रीगन-गॉनरिलच्या बोलण्यात लियरच्या स्वभावदोषांची चर्चा ही पहिल्या पातळीवर अर्थपूर्ण असून ती दुसरी पातळी सूचित करणारी आहे. लियरला म्हातारचळ लागला असून त्याच्या लहरीपणाचा त्रास आपल्यालाही होऊ शकेल, असे कारण देऊन गॉनरिल-रीगन लियरला काबूत ठेवण्यासाठी त्याच्याशी दुष्टपणाने वागतात. असे पहिल्या स्तरावरील रचनाबंधाच्या संदर्भात म्हणता येईल. लियर जर अधिकार गाजवू लागला तर त्याने नुकताच केलेला सत्तात्याग आपणाला अपायकारक ठरायचा, हे नंतर गॉनरिलने दिलेले कारण महत्त्वाचे मानून जर आपण दोघींच्या संवादाचा अर्थ लक्षात घेतला तर लियरची उरलीसुरली सत्ता हस्तगत करण्याच्या योजनेचाच एक भाग म्हणजे लियरवर बुद्धिभ्रंशाचा आरोप करून ती छिनावून घेणे, अशी दुसऱ्या पातळीवरील रचनाबंधाची अर्थपूर्णता आपल्याला जाणवू लागते. (१.१.८०-८१) या नाटकातील लियरचे वेडे बोलणे पहिल्या पातळीच्या दृष्टीने केवळ वेडेपणाचे आहे आणि दुसऱ्या पातळीवर ते त्याच्या संवेदनशीलतेतील आणि जीवनदृष्टीतील परिवर्तन सूचित करणारे आहे. न्यायाधीशाने चोराला शिव्या देण्याची आणि शिपायाने वेश्येला मारहाण करण्याची भ्रमदृश्ये आणि त्यांना जोडून येणारी "तुला एक चष्मा घे", "हे घे... प्रमाणपत्र", "माझे बूट काढ ओढून" (४.६.१६४) अशी येणारी असंगतिपूर्ण वाक्ये, ही असेच दुहेरी कार्य करतात. लियरच्या किंवा टुकार टॉमच्या असंगतिपूर्ण बोलण्यातील काही शब्दांना किंवा वाक्यखंडांना प्रतिमांचा किंवा प्रतीकांचा अर्थ देऊन हे सर्व बोलणे दुसऱ्या पातळीवर सार्थ बनवले जाते. ग्लॉस्टर जेव्हा "त्या हाताचे मला चुंबन घेऊ दे." असे म्हणतो तेव्हा लियर, "मला तो प्रथम पुसू दे; त्याला आहे नश्वरतेचा वास." (४.६.१६३) असे उत्तर देतो. त्याचे हे बोलणे पहिल्या पातळीवर वेडेपणाचे आणि त्याचा प्रतिमात्म अर्थ घेतल्यास ते दुसऱ्या स्तरावरच्या जाणिवा प्रकट करणारे ठरते.

वादळात सापडलेल्या आणि नंतर डोव्हरला आलेल्या लियरच्या कृतिउक्ती पहिल्या पातळीवर केवळ वेडेपणाच्या आहेत. परंतु दुसऱ्या पातळीवर त्या लियरच्या नव्याने उमलत गेलेल्या शहाणपणाच्या आहेत. पहिल्या पातळीवर या कृतिउक्तींतून लियरचे वेड सलगपणे चित्रित होते. दुसऱ्या पातळीवरचे, लियरला प्राप्त होणाऱ्या शहाणपणाचे चित्र असे सलगपणे रेखाटले जात नाही. त्यात अनेक जागा न रेखाटलेल्या, अज्ञात ठेवल्या जातात. अनेक ठिंबे दिली जावी आणि या ठिंबांना जोडून एक सलग चित्र काढायला सांगितले जावे, तसे शेक्सपियर येथे करतो. लियरचे वादळाला आज्ञा फर्मावणे, आपण पंचमहाभूतांचे गुलाम आहोत असे त्याचे म्हणणे, वादळाने आपल्या मुलींशी हातमिळवणी केली असे त्याला वाटणे, हे वादळ छुप्या गुन्ह्यांना शोधणारा दंडाधिकारी असल्याचे त्याला जाणवणे, यांमध्ये उघडपणे सलगता निर्माण करणारी संगती शेक्सपियरने प्रस्थापित केली नाही. सकृद्दर्शनी त्याला वादळाच्या जाणवलेल्या या अर्थांमध्ये त्याचे वेडेपण दर्शविणारी असंगती आहे. परंतु आंतरिक पातळीवर त्यांच्यामध्ये सलगता आणि संगती निर्माण करणारे एक अकथित, छुपे असे नाते अस्तित्वात

अनुक्रमणिका

आहे. हे नाते वाचक-प्रेक्षकांनी शोधायचे आहे. लियरचे वनस्पतींचा मुकुट घालणे, फुलांचा पोषाख चढवणे, त्याला होणारे भ्रम आणि शेवटी "चल, आपण दूर तुरुंगात जाऊ या; आपण दोघेच गात राहू या पिंजऱ्यामधील पक्ष्यांसारखी...." (५.३.१७७) हे त्याने कॉर्डीलिआशी केलेले संभाषण, याची रचना अशीच आहे. येथेही वाचक-प्रेक्षकांनी मधल्या अज्ञात जागा भरायच्या आहेत. शेक्सपियरने भरायच्या ठेवलेल्या या अज्ञात जागा अशा आहेत की, त्याचे अनेक पर्याय असू शकतील. वेगवेगळे पर्याय वेगवेगळ्या वाचक-प्रेक्षकांना जाणवू शकतील. अशा प्रकारची अनेकार्थता, अनेकार्थसमावेशनक्षमता शेक्सपियरने या नाटकात निर्माण करून ठेवली आहे. त्यामुळे हे नाटक सदेव वर्तमानकालीन आणि वैश्विक बनले आहे.

*राजा लियर* हे नाटक एकाच वेळी दोन स्तरांवर अर्थपूर्ण बनत असल्यामुळे ते रंजनाच्या हेतूने नाटकाकडे वळणाऱ्या वाचकप्रेक्षकाचे आणि जीवनाच्या अर्थपूर्णतेच्या प्रत्ययाच्या अपेक्षेने नाटकाकडे जाणाऱ्या वाचकप्रेक्षकाचे, असे दोघांचेही समाधान करू शकते.

*राजा लियर* या नाटकाची रचना विपरीतभावात्मक आहे. माणूस भोवतालच्या परिस्थितीचे आकलन करतो, आपल्या प्रेरणापूर्तीसाठी ही परिस्थिती अनुकूल असल्याचा निर्णय घेऊन तो कृती करतो, त्या कृतीचे परिणाम त्याच्या अपेक्षेच्या उलट होतात. अशा प्रकारे घडणारे प्रसंग हे विपरीतभावात्मक असतात. व्यक्तीच्या प्रेरणा, भावना, एवढेच नव्हे तर शब्द या सर्वांची रचना विपरीत पद्धतीची असू शकते. शोकांतिकेचा प्रारंभ आणि अंत यांच्यात विपरीतभावात्मक नाते प्रस्थापित झालेले असते. नाटकाचा प्रारंभ आणि अन्त या दोन टोकांमधील अनेक प्रसंगांतही असेच विपरीतभावात्मक नाते असते. या नात्यातील विरोध वाचकप्रेक्षकाच्या मनात प्रारंभिक अवस्था आणि उत्तरावस्था यांची तुलना करायला भाग पाडतो. ही तुलना त्याच्या मनात शोकभाव निर्माण करते. प्रारंभी लियर म्हणतो, "आमच्या वार्धक्यातून झटकून टाकायच्या सगळ्या काळज्या आणि कटकटी, सोपवायचे त्यांना तरुणांच्या ताकदीवर, आणि सरकायचे रांगत मृत्यूकडे निर्भार होऊन, असा आहे आम्ही आता निर्धार केलेला." (१.१.७२) शेवटी याच्या नेमके उलट घडते. राज्य वाटून दिल्यावर त्याच्या कटकटी आणि काळज्या वाढतात. तो 'निर्भार' होऊन मृत्यूकडे रांगत सरकत नाही. कॉर्डीलिआच्या मृत्यूच्या अतीव दुःखाने तो मरतो. मृत्यू सुद्धा त्याच्यावर अचानक झडप घालतो. कॉर्डीलिआ आपल्यावर प्रेम करीत नाही म्हणून लियर कॉर्डीलिआशी नाते तोडतो; स्वतःच्या भुकेसाठी स्वतःच्याच संततीचा घास करणारा येथून पुढे आपला निकटवर्ती असेल, असे तिला बजावतो. फ्रान्स जेव्हा पत्नी म्हणून तिचा स्वीकार करतो तेव्हा, तिला घेऊन जा, "आम्हांला नाही इच्छा तिचे तोंड पुन्हा पाहण्याची" असे तो फ्रान्सला सांगतो. शेवटी याच्या उलट होते. कॉर्डीलिआच्या प्रेमाचा त्याला साक्षात्कार होतो. बाप-मुलगी नाते तुटत नाही. तिच्या मृत्यूत आपल्याला समाधान वाटेल हे सुचवणाऱ्या लियरला तिच्या मृत्यूचे असह्य दुःख होते. त्याला तिचे तोंड पाहण्याची इच्छा नसतानाही आपल्या अस्तित्वासाठी त्याला तिची मदत घ्यावी लागते. विपरीतभावामध्ये अनेकदा अपेक्षित आणि प्रत्यक्ष परिणामांमध्ये साम्य असते परंतु त्यामागची कारणे, संदर्भ यांच्यात विरोधी नाते असते. राज्य मुलींना दिल्यानंतर लियरला मरण हवे असते. असेच मरण त्याला येते परंतु मरणाचे त्याला अपेक्षित असलेले स्वरूप आणि मरणाचे प्रत्यक्ष स्वरूप यांत विरोध असतो.

या नाटकाचा प्रारंभ आणि अंत यांमध्ये घडणाऱ्या घटनांमध्येही असेच विपरीतभावात्मक नाते प्रस्थापित होते. लियरचे केंटबद्दलचे आकलन आणि प्रत्यक्षातील केंट; लियरचे मुलींबद्दलचे आकलन आणि त्यांची प्रत्यक्ष रूपे; ग्लॉस्टरचीही आपल्या दोन मुलांबद्दलची आकलने आणि त्यांची प्रत्यक्ष रूपे; यांमध्येही विपरीतभावात्मक नाते प्रस्थापित केले जाते. या शिवाय अनेक बारीकसारीक घटनाप्रसंगांत, प्रेरणांत, आकलनांत असे नाते प्रस्थापित केले जाते. गॉनरिल ऑल्बनीला मारायचे ठरवते परंतु ती मरते आणि तो जिवंत राहतो. गॉनरिल-रीगन यांना संपूर्ण सत्ता हवी असते परंतु त्यांना ती न मिळता सत्तेचा मोह नसलेल्या ऑल्बनीला ती मिळते. एडगर मारला जावा म्हणून एडमंड कारस्थान रचतो; परंतु नेमके उलट घडते. एडगरऐवजी आपल्याला जहागीर मिळावी म्हणून एडमंड प्रयत्न करतो परंतु जहागीर एडगरलाच मिळते. आपला नवरा महामूर्ख, भागूबाई आहे असे गॉनरिलला वाटते पण तो मुत्सद्दी आणि शूर ठरतो.

माणसाच्या आकलनाच्या मर्यादा हा शोकांतिकेचा पाया असतो. माणसाला परिस्थितीचे झालेले आकलन अपुरे, त्रुटित आणि चुकीचे असते. ते परिपूर्ण आणि अचूक आहे यावर त्याचा विश्वास असतो. त्याच्या आकलनाच्या उलट असे प्रत्यक्ष

वास्तव जेव्हा त्याच्या समोर येते तेव्हा त्याला होणारे दुःख शोकांतिकेत चित्रित होत असते. विपरीतभावात्मक न्यासात प्रारंभिक आणि अंतिम असे दोन घटक असतात. या दोन घटकांमध्ये अनेक घटना, प्रेरणा, आकलने असू शकतात. प्रारंभिक घटनेपासून अंतिम घटनेपर्यंत अनेक घटना घडू शकतात. प्रारंभिक घटनेपासून अंतिम घटनेपर्यंत जे जे घडते ते ते सर्व, प्रारंभ व अंत यांसह, सुसंगत आणि अपरिहार्य असावे लागते. या सुसंगतीवर आणि अपरिहार्यतेवर विपरीतभावात्मक न्यासाचे मूल्य अवलंबून असते. *राजा लियर* हे नाटक जर "दुष्ट मुलींनी आपल्या पित्याचा केलेला छळ" या परिप्रेक्ष्यात घेतले तर यांतील विपरीत भावांना सुसंगती आणि अपरिहार्यता प्राप्त होत नाही. परंतु तीव्र सत्ताप्रेरणेतून जन्मलेला दुष्टावा, या दृष्टीने त्याकडे पाहिल्यास त्यातील विपरीतभावाला मूल्य प्राप्त होते. सत्ताप्रेरणेच्या दृष्टीने यांतील संघर्षाकडे पाहणे हे अर्थातच आपल्या मर्जीवर अवलंबून नसून नाट्यांतर्गत घटक आपणांस तसे पाह्यला भाग पाडतात, म्हणून आपण या दृष्टीने नाटकाकडे पाहू शकतो.

लियरच्या शोकांतिकेला फ्रेंच फौजेचा पराभव हा कारणीभूत होतो. फ्रेंच फौजेचा जर विजय झाला असता तर लियर आपला उर्वरित आयुष्य राजा म्हणून जगू शकला असता. फ्रेंच फौजेचा पराभव हा योगायोग असेल तर या शोकान्तिकेचा अंत अपरिहार्य ठरत नाही. परंतु फ्रान्सचा पराभव हा योगायोग वाटू नये याची काळजी शेक्सपियरने घेतली आहे. कॉर्डीलिआ फ्रान्सची राणी बनून अंदाजे तीन एक आठवडे झाले आहेत. फ्रान्सच्या राजाच्या कॉर्डीलिआवरील प्रेमामुळेच हे सैन्य इंग्लंडवर आक्रमण करीत आहे. त्यातही फ्रान्सच्या राजाला सैन्याचे नेतृत्व करता आलेले नाही; ते ऐनवेळी फ्रेंच सेनापतीवर सोपवले गेले. त्यामुळे युद्ध जिंकण्यासाठी आवश्यक असलेली तीव्र प्रेरणा या सैन्यापाशी नाही. या उलट ब्रिटिश फौजेची परिस्थिती आहे. फ्रेंच सैन्याचे आक्रमण हे परसत्तेचे आक्रमण म्हणून स्वीकारले गेले आहे. त्यामुळे त्यात राष्ट्रीय अस्मितेचा प्रश्न गुंतला गेला आहे. हे परचक्र परतवून लावण्याची जिद्द सेनेत निर्माण होऊ शकणार आहे. राजघराण्यातील भांडणात फ्रान्सने दिलेल्या दखलीबद्दल ऑल्बनी म्हणतो, "आमच्या मुलखावर फ्रान्सने आहे आक्रमण केलेले, एवढ्यापुरताच ह्या कामाशी आमचा संबंध, त्याने महाराजांना आणि इतरांना धीर मिळतो म्हणून नव्हे;....." (५.१.१७४) लियरची बाजू ऑल्बनीला जरी न्याय्य वाटत असली तरी त्यासाठी फ्रान्सचे झालेले आक्रमण त्याला मान्य नाही. एडमंड जिद्दीने या युद्धाचे नेतृत्व करतो. कारण लियर-कॉर्डीलिआचा पराभव करणे त्याला त्याच्या अस्तित्वाच्या दृष्टीने आवश्यक वाटते. शेक्सपियरने फ्रेंच आणि ब्रिटीश सेनेसंबंधीची ही परिस्थिती सूचित करून ठेवल्याने या युद्धात ब्रिटिश सेनेचा जय हा योगायोग राहत नाही.

राज्यवाटणीपासून लियरच्या मृत्यूपर्यंत घटनांनी व्यापलेला कालपट त्यांच्याशी कितपत सुसंगत आहे याचाही येथे विचार केला पाहिजे. राज्य वाटल्यानंतर लियर गॉनरिलकडे तात्काळ राह्यला जातो. तेथे गेल्यानंतर एखादा आठवडा त्याचा मानमरातब सांभाळला जातो. सामान्यपणे लियरच्या मुक्कामाच्या दहाव्या-अकराव्या दिवशी गॉनरिल त्याचा अवमान करते. रागावलेला लियर प्रथम कॉर्नवालला व तेथून तात्काळ ग्लॉस्टरला येतो. हा पूर्ण प्रवास दोनएक दिवसांचा धरू. राज्यवाटणीनंतर तेराव्या-चौदाव्या दिवशी रीगन-गॉनरिल ग्लॉस्टर येथे लियरचा पुन्हा अवमान करतात. त्याच दिवशी म्हणजे सामान्यपणे चौदाव्या दिवशी रात्री लियर वादळात जातो. त्याच दिवशी रात्री त्याची रवानगी डोव्हरला होते. तो सामान्यपणे सोळाव्या दिवशी डोव्हरला पोचतो. लियर वादळात गेल्याच्या दुसऱ्या दिवशी ग्लॉस्टरचे डोळे फोडले जातात आणि कॉर्नवालचा मृत्यू होतो. त्याच दिवशी एडगर ग्लॉस्टरला डोव्हरला घेऊन जायला निघतो. सामान्यपणे सतराव्या दिवशी ग्लॉस्टर डोव्हरला पोचतो. राज्यवाटणी नंतर पंधराव्या दिवशी कॉर्नवालच्या नरेशाचा मृत्यू झाल्यानंतर शाही इतमामाने त्याचा अंत्यसंस्कार, शोकाचे दिवस, इतर उमरावांच्या सान्त्वनार्थ भेटी हे सर्व घडण्यास पंधरा दिवस लागत असणार. परंतु फ्रेंच फौजेचे आक्रमण झालेले असल्याने मृतासंबंधीचे रीतिरिवाज सामान्यपणे एका आठवड्यात आटोपले गेले असावे, असे आपण समजू. राज्य वाटणी नंतर एकवीस दिवसांनी रीगनचे व गॉनरिलचे सैन्य डोव्हरकडे रवाना झाले असावे. सतराव्या दिवशी डोव्हरला ग्लॉस्टर-लियरची भेट आणि लियरला झोपेचे औषध देणे, या घटना घडलेल्या असणार. लियर चोवीस ते तीस तास गाढ निद्रेत असणार असे जर मानले तर तो एकोणिसाव्या दिवशी जागा झाला असणार. राज्यवाटणीनंतर एकवीस दिवसांनंतर निघालेले ब्रिटिश सैन्य तेविसाव्या-चोविसाव्या दिवशी डोव्हरला येऊन पोचले असणार. त्यानंतर पंचविसाव्या दिवशी युद्ध होऊन लियर-कॉर्डीलिआ पकडले गेले असणार. त्याच दिवशी

अनुक्रमणिका






गॉनरिल, रीगन, एडमंड, ग्लॉस्टर, कॉर्डीलिआ आणि लियर यांचे मृत्यू झाले असले पाहिजेत. म्हणजे राज्यवाटणी ते लियरचा मृत्यू या घटना एक महिन्याच्या आतच घडलेल्या आहेत. लियर-ग्लॉस्टरच्या संदर्भात काळाचे हे गणित शेक्सपियरने सांभाळले असे आपणांस म्हणता येते.

गॉनरिल, रीगन आणि एडमंड यांच्यातील प्रेमसंबंधाबाबत हे गणित कितपत सुसंगत आहे, हे तपासले पाहिजे.

राज्यवाटणीनंतर चौदाव्या दिवशी लियर वादळात जातो. पंधराव्या दिवशी, ग्लॉस्टरला आलेली गॉनरिल एडमंडला घेऊन ऑल्बनीला जायला निघते. ती गेल्यानंतर त्याच दिवशी ग्लॉस्टरच्या डोळे फोडण्याच्या आणि कॉर्नवालच्या मृत्यूच्या घटना घडतात. ग्लॉस्टरहून ऑल्बनीला जायला निघण्याच्या वेळी गॉनरिल एडमंडच्या प्रेमात पडते. ते दोघे; सामान्यपणे सतराव्या दिवशी ऑल्बनीला पोचतात. प्रवासात ते दोघे अधिक निकट येतात. भावी मनसुब्यांबद्दल प्रवासातच दोघांच्या गप्पा होतात. ऑल्बनीला पोचताच तात्काळ एडमंड ग्लॉस्टरला परत जायला निघतो. तो ग्लॉस्टरला एकोणिसाव्या दिवशी पोचला असला पाहिजे. राज्यवाटणीनंतर एकोणिसाव्या दिवशी आणि कॉर्नवालच्या मृत्यूनंतर चौथ्या दिवशी विधवा रीगनची आणि एडमंडची भेट होऊन ती एडमंडच्या प्रेमात पडली असणार. एकोणिसाव्या-विसाव्या दिवशी एडमंड डोव्हरला रवाना होतो. गॉनरिलने एडमंडला ऑल्बनीचा काटा काढण्याविषयीचे लिहिलेले पत्र घेऊन ऑझ्वल्ड विसाव्या दिवशी ग्लॉस्टरला येतो. एडमंड डोव्हरला गेल्याचे कळल्यावर तो तात्काळ डोव्हरला जातो. तो एकविसाव्या दिवशी डोव्हरला पोचतो आणि एडगरकडून मारला जातो.

आपल्या हिशोबाप्रमाणे एडगर-ग्लॉस्टर हे सतराव्या दिवशी डोव्हरला पोचतात. त्याच वेळी ग्लॉस्टरची लियरशी भेट होते; ही भेट झाल्याझाल्या ऑझ्वल्ड तेथे येतो आणि एडगरकडून मारला जातो. ऑझ्वल्डचे डोव्हरला पोचणे एकविसाव्या दिवशीच्या आधी घडणे शक्य नाही. तेव्हा राज्यवाटणीनंतर तो सतराव्या दिवशी एडगरकडून मारला जाणे शक्य नाही. येथे शेक्सपियरचे काळाचे गणित चुकते.

ऑझ्वल्ड गॉनरिलचे पत्र घेऊन ग्लॉस्टरला विसाव्या दिवशी पोचतो. तेव्हा कॉर्नवाल मरून पाच दिवस झालेले असतात. रीगन ऑझ्वल्डजवळ, आपला एडमंडशी लग्न करायचा इरादा असल्याचे बोलून दाखवते. आपल्या फौजेबरोबर ती तेविसाव्या-चोविसाव्या दिवशी डोव्हरला पोचते. त्याच दिवशी ऑल्बनी-गॉनरिल आपल्या फौजेसह डोव्हरला पोचतात. त्याच दिवशी एडमंड-रीगनची भेट होते. गॉनरिलच्या व त्याच्या प्रेमासंबंधी ती त्याला वक्रपणे विचारते, "...माझ्या मेव्हण्याची वाट, त्या निषिद्ध जागेकडे जाणारी, तुम्हांला कध्धीच नाही सापडलेली?" या नाटकाच्या कालपटात गॉनरिल-एडमंड यांची एकांतात भेट होण्याला अवसरच नसल्यामुळे रीगनच्या या विचारण्याला अर्थ उरत नाही.

रीगन-कॉर्नवाल यांचे परस्परविश्वासाचे आणि परस्पर-सहकार्याचे वैवाहिक जीवन शेक्सपियरने दाखवले असल्यामुळे नवरा मरताच अवघ्या चौथ्या दिवशी ती एडमंडच्या प्रेमात पडते हे वाचकप्रेक्षकाला स्वीकारणे अवघड होते. परंतु गॉनरिलशी असलेली सत्तास्पर्धा, फ्रेंच सेनेचे आक्रमण आणि युद्धात पराभव झाल्यास केवळ सत्तेलाच नव्हे तर जिवाला निर्माण झालेला धोका, ह्या सर्व गोष्टींचा विचार करता सर्व गुणधर्मांत कॉर्नवालच्या तोडीस तोड असलेला एडमंड नवरा म्हणून स्वीकारण्याचा तिचा घाईने घेतलेला निर्णय योग्यच म्हणावा लागतो.

महिन्याभराच्या अल्प कालावधीत लियरच्या कुटुंबाला 'होते की नव्हते' करून टाकणारा संघर्ष चित्रित करून शेक्सपियरने सत्ताप्रेरणेचे "दादुलेपण" प्रकट केले आहे.

शेक्सपियरच्या या नाटकाचा रचनाबंध अशा प्रकारचा आहे की त्यात वेषांतर-रूपांतराच्या क्लृप्तीला वाव नाही. लियरच्या राज्यवाटणीपासून ते त्याच्या मृत्यूपर्यंत हे नाटक वास्तवाच्या पातळीवर राहात असल्यामुळे या पातळीला छेद देणाऱ्या या अवास्तव क्लृप्त्या नाटकाचा रचनाबंध बिघडवून टाकतात. संपूर्ण नाटक वास्तवाच्या पातळीवर स्वीकारणाऱ्या वाचकप्रेक्षकांना केंटचे आणि एडगरचे वेषांतर-रूपांतर स्वीकारणे जड जाते. एरव्ही अतिशय हुषार असलेली पात्रेही मुळात निकटवर्तीय असणाऱ्या आणि वेषांतर-रूपांतर करून त्यांच्या भोवती वावरणाऱ्या पात्रांना ओळखू शकत नाहीत, यावर वाचकप्रेक्षकांना विश्वास ठेवणे अवघड जाते; तरीही शेक्सपियरने या क्लृप्तीची योजना केली आहे. केवळ मनोरंजनासाठी नाटकाकडे येणाऱ्या वाचकप्रेक्षकांसाठी त्याने ही योजना केलेली असणार. *राजा लियर* या नाटकाच्या द्विस्तरीय रचनेचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. यातील रंजनपर स्तरासाठी शेक्सपियरने या क्लृप्त्या वापरलेल्या आहेत. या नाटकाचा रंजनपर स्तर दुसऱ्या कलात्मक स्तराशी सुसंगत राहतो, हेही पूर्वी सांगितलेले आहेच.








याला केंट आणि एडगर यांचे वेषांतर-रूपांतर मात्र अपवाद आहे. राजा असलेल्या लियरच्या पाठीशी सावलीसारख्या राहणाऱ्या स्वामिनिष्ठ, विश्वासू व्यक्तीची या नाट्यरचनेत आवश्यकता आहे. परंतु त्यासाठी केंटच्या जहागीरदाराचे वेषांतर करवून त्याला या कामासाठी वापरण्याची काहीच आवश्यकता नव्हती. लियरच्या संवेदनशीलतेत आणि जीवनदृष्टीत होणाऱ्या परिवर्तनासाठी आणि जीवनदृष्टीत होणाऱ्या परिवर्तनासाठी त्याला वादळात सापडलेल्या अर्धनग्न, निराधार, पददलित व्यक्तीचे प्रत्यक्ष दर्शन घडवणे अर्थपूर्ण होते. परंतु त्यासाठी एडगरला टुकार टॉमचे सोंग घ्यायला लावण्याची काहीच गरज नव्हती. टुकार टॉमचे सोंग घेणारा एडगर आपल्या बापाला घेऊन डोव्हरला येतो आणि आत्महत्त्येच्या प्रयत्नापासून तो युक्तीने त्याला वाचवतो हा संपूर्ण प्रसंग केवळ रंजनार्थ आलेला आहे. नाटकाच्या एकूण अर्थपूर्णतेला तो कोणतेही परिमाण मिळवून देत नाही.

शेक्सपियरने *राजा लियर* मध्ये प्रतिमांची विपुल प्रमाणात योजना केली आहे. आपल्या आतापर्यंतच्या विवेचनात आपण काही प्रतिमांची चर्चाही केली आहे. नाटकामध्ये प्रतिमायोजना आवश्यक असतेच असे नाही. जेव्हा मानवामधील मूलभूत प्रेरणांच्या संघर्षाचे आशयसूत्र नाटककाराने स्वीकारलेले असते तेव्हा प्रतिमांमधून या संघर्षाचे आकलन अभिव्यक्त होणे स्वाभाविक असते. कारण हा संघर्ष मूलभूत असल्याने तो स्वाभाविकपणे कालातीत आणि वैश्विक असतो. प्रतिमेमध्ये दोन घटकांत प्रस्थापित होणारे साधर्म्यवैधर्म्यात्मक नाते अनेक अर्थांचे सूचन करते. प्रतिमेमध्ये बाहेरचे अनेक अर्थ आपल्यात सामावून घेण्याची क्षमता असल्याने तिच्यात अर्थसमृद्धीची आणि अर्थव्यापकतेची प्रक्रिया चालू असते. प्रत्येक वाचक-प्रेक्षक तसेच प्रत्येक काळातला वाचक-प्रेक्षक आपल्या प्रत्येक वाचन-प्रेक्षणात आपले वैयक्तिक अनुभव नाट्यप्रतिमेच्या साच्यात ओतून ते सार्थ बनवतो — आणि त्या नाट्यप्रतिमेची अर्थसमृद्धी आणि अर्थव्यापकता वाढवीत जातो. उदाहरणार्थ, जेव्हा लियर म्हणतो, "घाला पापावर सोन्याचे चिलखत आणि न्यायासनाचा समर्थ भालाही जातो मोडून इजा केल्याशिवाय; घाला लक्तरे आणि ठेंगूची काडीही जाते आरपार." (४.६.१६४) तेव्हा आपल्या काळातल्या दिल्या जाणाऱ्या न्यायालाही या प्रतिमा आपल्यात सामावून घेतात आणि आपल्या भोवतीचे न्यायासंबंधीचे वास्तव अर्थपूर्ण बनवतात. तेव्हा नाटकातील प्रतिमायोजना नाट्याला सार्वत्रिकता, वैश्विकता आणि अखंड वर्तमानकालीनता प्राप्त करून देते. *राजा लियर* या नाटकातील प्रतिमासृष्टी या दृष्टीने सक्षम आणि अर्थपूर्ण आहे.

*राजा लियर* या नाटकातील प्रतिमासृष्टी ही मुख्यत्वेकरून नाट्यात्म प्रसंगातून घडलेली आहे. शेक्सपियर परस्परविरोधी प्रेरणांतून जन्मणाऱ्या नाट्यात्म प्रसंगाला प्रतिमारूप देतो. वर उल्लेखिलेली प्रतिमा याच प्रकारची आहे. आपल्याला गाण्याचा नाद केव्हापासून लागला हे सांगताना विदूषक म्हणतो, "तुम्ही आपल्या कन्यांना आपल्या मातोश्री बनविल्यात तेव्हापासुन. तेव्हापासून मी हा असा गातो आहे, जेव्हा तुम्ही त्यांच्या हातात छडी दिलीत आणि स्वतःची पाटलोण काढून ठेवलीत." (१.४.९३) येथे लियरला आणि त्याच्या मुलींना मिळणारे रूप विपरीतभावात्मक आहे. लियरच्या वादळाला उद्देशून केलेल्या भाषणातील प्रतिमासृष्टी अशीच नाट्यपूर्ण प्रसंगातुन घडलेली असून त्यातील अनेक प्रतिमा विपरीतभावात्मक आहेत.

"तोंडापर्यंत अन्न आणणाऱ्या या हाताला या तोंडानेच फाडून काढावे त्या सारखेच हे नव्हे का?" (३.४.१३२)

"ऐक निसर्गा ऐक!... घाल वांझपणा तिच्या गर्भाशयात! कर शुष्क तिच्यामधली सृजनांची इंद्रिये..." (१.४.९७)

"पोकळ ऐश्वर्या, हे औषध." (३.४.१३२)

"तो शाप आहे कालालाच, जिथे वेडे आहेत दाखवीत आंधळ्यांना मार्ग." (४.१.१४९) अशा अनेक नाट्यप्रतिमांनी हे नाटक शेक्सपियरने अर्थसमृद्ध बनवले आहे.

नाट्यप्रतिमा या नाटकातील पात्रांच्या प्रेरणा, परिस्थितीची आकलने आणि प्रेरणा-संलग्न भावना यांची अर्थपूर्ण अभिव्यक्ती साधतात. परंतु महत्त्वाचे म्हणजे नाटककाराच्या जाणिवा त्या सूचित करतात. जेव्हा ग्लॉस्टर "उनाड मुलांना जशा माशा तसेच आपण ह्या देवांना, जे आपल्याला असतात मारीत त्यांच्या क्रीडेसाठी" (४.१.१४८) असे म्हणतो तेव्हा देव-मानव-संबंधाबद्दलची ही जाणीव केवळ ग्लॉस्टरची नसते तर ती नाटककाराचीही असते. मानवाचे दुर्बलत्व ही प्रतिमा सूचित करते. पुढे जेव्हा लियर "त्यांनी सांगितले मी आहे सर्वशक्तिमान; खोटे आहे, मी नाही ज्वरापासुन मुक्त." (४.६.१६२) हे बोलतो आणि नंतर तो जेव्हा ग्लॉस्टरला "मला तो प्रथम पुसू दे; त्याला आहे नश्वरतेचा वास" (४.६.१६३) असं म्हणतो तेव्हा यांतील सर्व प्रतिमा एकमेकींशी जोडल्या जाऊन माणसाच्या मूलभूत दुर्बलत्वाची जाणीव स्पष्टपणे प्रकट करतात आणि

ती नाटककाराची जाणीव असल्याचा निष्कर्ष आपण काढू शकतो. एखाद्या नाटकात विपुल प्रमाणात प्रतिमा आढळल्या की, त्या नाटकाची भाषा काव्यात्म आहे, असे म्हणण्याचा मोह अनेकदा होतो. परंतु नाट्यप्रतिमा आणि काव्यप्रतिमा यांच्या सामग्रीत आणि उद्दिष्टांत भेद असतो. नाटकातील प्रतिमा काव्याचा प्रत्यय देणाऱ्या असतीलच असे नाही. काव्य प्रतिमा ही शब्दांतील भावनिक अर्थांची साधर्म्य-वैधर्म्यात्मक रचना असते. ती अर्थपूर्ण संवेदना-भावनांचा प्रत्यय घडवते; एक सबंध भावनिक अनुभव साकार करते. नाट्यप्रतिमा ही परस्परविरुद्ध प्रेरणांतून साकार होणाऱ्या नाट्यपूर्ण प्रसंगातून घडते आणि ती प्रेरणा, प्रेरणासंलग्न भावना आणि परिस्थितीची आकलने यांची अर्थपूर्णता साकार करते. अर्थात काव्यप्रतिमा आणि नाट्यप्रतिमा यांच्यात काटेकोर भेद करणे शक्य नसते. एखाद्या नाट्यप्रतिमेत काव्यात्मतेचा आणि काव्यप्रतिमेत नाट्यात्मकतेचा कमी अधिक अंश असू शकतो. तसेच एखाद्या काव्याला जर नाट्यात्मकतेचे आणि नाट्याला काव्यात्मतेचे अंग असेल तर त्यात अनुक्रमे नाट्यप्रतिमा आणि काव्यप्रतिमा येऊ शकतात.

*राजा लियर* या नाटकात प्रतिमांची योजना जरी विपुल प्रमाणात असली तरी हे नाटक काव्यात्म आहे असे म्हणता येत नाही. लियरचे कॉर्डीलिआला उद्देशून केलेले "चल, आपण दूर तुरुंगात जाऊ या..." हे भाषण काव्यप्रतिमांमधून साकार झालेले आहे. म्हणून लियरचे एवढेच भाषण काव्यात्म आहे, असे म्हणता येते.

नाट्यप्रतिमेचे वक्तृत्वातील अलंकारांशी अधिक जवळचे नाते आहे. दोन्ही ठिकाणी नाट्य असते. वक्तृत्व हे श्रोत्यांच्या वैचारिक-भावनिक भूमिकेत परिवर्तन घडवून आणण्याचे कार्य करते. नाट्यातील संवादांचेही एक कार्य समोरच्या पात्राच्या वैचारिक-भावनिक भूमिकेत परिवर्तन घडवून आणणे हे असते. त्यामुळे नाट्यप्रतिमा आणि वक्तृत्वातील अलंकार यांच्यात पुष्कळच साम्य असते.

शेक्सपियरचे हे नाटक हे नकाराचे नाटक आहे. "नाही" आणि नकारसूचक शब्द हे नाटकातील कळीचे शब्द आहेत. लियर जेव्हा कॉर्डीलिआकडून प्रेमाचे होकारात्मक वर्णन अपेक्षितो तेव्हा ती "काही नाही महाराज" असे उत्तर देते. यावर लियर म्हणतो, "काही नाही मधून निघेल काही नाहीच." (१.१.७४) या नाटकात 'नाही', 'काही नाही' किंवा इतर नकारार्थी शब्द सतत भेटत राहतात. नाटकाच्या शेवटच्या प्रसंगात लियरच्या मृत्यूच्या क्षणीही हा "नाही" आपणांस भेटतो. मरणापूर्वी लियर कॉर्डीलिआला उद्देशून म्हणतो, "... माझे लाडके वेडुले गेले फासावर! नाही, नाही, जीव नाही!.... तू नाही कधीही येणार, नाहीच, नाहीच, नाहीच, नाहीच!" (५.३.१८८)

या नाटकातील घटनाप्रसंग "नाही" ने बांधले गेले आहेत. लियरने राज्य वाटून टाकल्यावर त्याच्या राजेपणाच्या जीवनातील एक एक बाब काढून घेऊन त्या "नाही"शा केल्या जातात; थेट आपली राजवस्त्रेही लियर स्वतःच फाडून "नाही"शी करतो. ग्लॉस्टरबद्दलही हेच घडते. त्याचा वाटा, जहागीर, डोळे हे सर्व 'नाही'से केले जाते. लियरला कॉर्डीलिआसमवेत जगायला मिळत नाही, एडमंडला जहागीर आणि गॉनरिल-रीगन प्राप्त होत नाही. गॉनरिल-रीगनला एडमंड मिळत नाही. कॉर्डीलिआची बापाच्या सुटकेची इच्छा फलद्रूप होत नाही. युद्ध जिंकूनही गॉनरिल-रीगन-एडमंड यांना सत्तोपभोग लाभत नाही. असे अनेक "नाही" आपणांस अनेक प्रसंगांत भेटत जातात. शेवटी विपरीतता अशी की ज्यांना काहीच नको असते त्या ऑल्बनीला आणि एडगरलाच सर्व प्राप्त होते.

या नाटकातील प्रसंगांमध्येच नाही तर नाट्यप्रतिमांतही हा 'नकार' भिन्न भिन्न रूपांत आपणांस भेटत राहतो. लियरला उद्देशून विदूषक 'अंक नसलेले शून्य', 'तू काहीच नाहीस', 'शेंगेचे टरफल', म्हणतो. (१.४.९४) लियरबद्दलच्या क्रूर वर्तनाबद्दल विदूषक म्हणतो, 'एक कोकिळा घास भरवुनी चिमणीने मोठी केली, चोच जराशी मोठी होता मान तिची छाटून गेली", "मेणबत्ती विजून गेली" (१.४.९५) लियर गॉनरिलच्या संदर्भात निसर्गाला उद्देशून म्हणतो, "घाल वांझपणा तिच्या गर्भाशयात! कर शुष्क तिच्या मधली सृजनाची इंद्रिये आणि तिच्या भ्रष्ट शरीरामधून नको उपजवूस एक पोट तिला मानणारे!" (१.४.९७) लियर म्हणतो, "मी सगळ्याच छपरांचा त्याग करीन." (२.४.१२०) लियरच्या वादळाला केलेल्या आवाहनातील सर्व प्रतिमा नकार-संलग्न आहेत. "सगळेच बदलावे वा संपावे" म्हणून तो पंचमहाभूतांना आवाहन करीत आहे. ही पंचमहाभूतेही लियरला "होते की नव्हते" करण्याचा प्रयत्न करतात. (३.१.१२५) ऑल्बनी गॉनरिलला म्हणतो, "जी वृत्ती आपल्या मुळालाच टाकते झिडकारून... आपल्या खोडाच्या जीवनरसापासुन जी स्वतःलाच टाकते पेचून आणि विच्छेदून, ती अटळपणे जाते वाळत आणि येते जळण्याच्या कामी." (४.२.१५१) या संपूर्ण विवेचनात जागोजागी उद्धृत



अनुक्रमणिका

केलेल्या अनेक प्रतिमांमध्ये हा नकार सुप्तासुप्त रूपात पाह्यला मिळू शकतो.

"नाही-काहीच नाही" हे शब्द लियरच्या संपूर्ण कुटुंबाचा विनाश सूचित करतात. सत्ता-प्रेरणेने झपाटलेली ही सर्व माणसे एकमेकांपासून सत्ता हिरावून घेण्यासाठी आणि आपली सत्ता हिरावली जाऊ नये म्हणून संघर्ष करतात आणि याचे पर्यवसान शेवटी सर्वांच्या विनाशात होते. जे सत्ताप्रेरणेच्या कक्षेबाहेर राहतात त्यांच्या गळ्यात शेवटी सत्ता माळ घालते

केवळ सत्ताप्रेरणेचीच नव्हे तर एकूण मानवजीवनाची अर्थपूर्णता हे नाटक अभिव्यक्त करते. एकूण सृष्टी, तिचे आणि मानवाचे नाते, मानवनिर्मित समाज आणि माणसा-माणसांतील नाती, मानवाच्या 'मानव' म्हणून मर्यादा आणि त्याची दु:खे अशा अनेक गोष्टींची अर्थपूर्णता प्रकट करणारे हे एक महान नाटक आहे.








# विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा

## मे.पुं. रेगे

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून आजवर महाराष्ट्रात पुरोगामी सुधारणावादी चळवळी जोमाने सुरू आहेत. बुद्धिप्रामाण्यवादी, विवेकवादी व विज्ञाननिष्ठ विचारसरणी ही पुरोगामी चळवळींनी महाराष्ट्रीय समाजाला दिलेली देणगी होय.

प्रस्तुत संपादित पुस्तकात प्रा. मे.पुं. रेगे यांनी कांट व व्हिट्गेन्स्टाईन या दोन युरोपियन तत्त्वज्ञांच्या भूमिकांचा समन्वय साधून अशा पुरोगामी विचारसरणींचे सखोल विश्लेषण केले आहे. बुद्धिप्रामाण्यवाद, विज्ञाननिष्ठा, श्रद्धा-अंधश्रद्धा या विषयांच्या प्रचलित मांडणीपेक्षा रेग्यांची या पुस्तकातील मांडणी पुष्कळच निराळी आहे. इहवाद, बुद्धिप्रामाण्यवाद, मानवतावाद, श्रद्धा आणि धर्म, विज्ञाननिष्ठा या विषयांच्या प्रचलित शिष्टमान्य मांडणीतील उणेपणा रेग्यांनी चिकित्सकपणे दाखवून दिला आहे.

नवसमाजाच्या उभारणीसाठी पुरोगामी विचारसरणीचा अंगीकार करीत असताना रेग्यांनी येथे उपस्थित केलेले मुद्दे व सुचवलेली फेरमांडणी आत्मसात केल्यास एक नवे सामाजिक, नैतिक तत्त्वज्ञान आपण नक्कीच रचू शकू.

**विभाग १**

**विवेकवाद**



**विभाग २**

**विज्ञान, विज्ञाननिष्ठा आणि अध्यात्म**



**विभाग ३**

**श्रद्धा**



**प्रा. रेगे यांची भूमिका विशद करणाऱ्या वसंत पळशीकर यांच्या प्रस्तावनेसह**

डेमी पृष्ठे : २० + ३३६ रु. २५०.००

**लोकवाङ्मयगृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई ४००-०२५**







अनुक्रमणिका

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




